

**“क्षणभर बघा...... काळजीपूर्वक वाचा आणि जीवनात असेच मनातल्या मनात हसत रहा..... हाच माझा संदेश”.- प्रकाश राऊत अमरावती, महाराष्ट्र राज्य 444606**

माझ्या साहित्याचा आनंद घेणा-या
सर्व वाचकांना तसेच आशय-पल्लवी,
मृदुला-सचिन व माझी प्रेमळ बायको
सौ. रेखा या सर्वांना ही कथाकृती
अर्पण.

## **लिहिण्यापूर्वी थोडसं...........**

'लिखाणाचा छंद' हा लहानपणापासूनच. पण खरी सुरूवात माझ्या लिखाणाला झाली ती 1978 पासून. मी तोतलाडोह प्रकल्पावर असतांना मला ईंग्रजी पेपर्स वाचायची खूप आवड होती. हळूहळू मी 'द हितवाद', नागपूर टाईम्स, काही लोकल पेपर्स मातृभूमी, जनमाध्यम ईत्यादी वृत्तपत्रात लिहिता लिहिता केंव्हा लेखक झालो हे कळलेच नाही. तरी जीवनातलं पहिलं पुस्तक लिहायला वय उलटून गेलं होतं. ज्ञानप्रकाशन पुणे येथील प्रकाशक श्री. कुणाल हजेरी हे मला एका कान्हेरे मैदान येथे नाशिकला भेटले व माझे पहिले पुस्तक 'नोकरशाहितील बाळूच्या गमतीजमती' हे 1.03.2011ला प्रकाशीत झाले. त्यानंतर मी ई-साहित्य डॉट कॉमवर माझे दुसरे पुस्तक डिजीटल फॉर्मॅटमध्ये 'आजच्या जगात वावरतांना' हे प्रकाशीत केले. त्यात श्री. सुनिल सामंत यांचा मी आभारी आहे. या वेबसाईटवरच मग मी अजून एक पुस्तक 'ई साहित्य काळाची गरज' हे प्रकाशीत केले. असे करत करत अमॅझॉनच्या सेल्फ पब्लीशींग वेबसाईटवर माझे चवथे पुस्तक 'Flowering of thoughts', 'kindle reader a need of the hour' असे व ईतर काही स्वत:च्या कोटेशनची अशी जवळपास दहा पुस्तके Publish केली.

मुळात लेखक व्हावे व पैसा कमवावा हा हेतू कधीच ठेवला नाही पण माझे विचार सर्व वाचकांपर्यंत पोहोचावे हीच प्रबळ ईच्छा ठेवून मी नेहमी लिखाण करीत असतो. मी सध्या प्रतिलीपीवर बरेचदा व नियमीत लिहित असतो. त्यावर मी माझ्या कल्पनेतून अनेक मनोरंजक गोष्टी किंवा माझे अनुभव कथन करीत आलो आहे. त्यावर माझे जवळपास छपन्नहजार वाचक सध्या माझे लेख,कथा, कविता ईत्यादी साहित्य सातत्याने वाचत असतात याचा मला फार अभिमान आहे. मला माझे आत्मकथन लिहिण्याची प्रेरणा यातूनच मिळाली व हे कार्य माझ्या हातून सुरू झाले. यात कितपत यश येईल हा भाग माझेसाठी अतिशय गौण आहे.

कोणतेही लिखाण करणे, वाटते तितके कधीच सोपे नसते. त्यात बरेचदा अनेक अडचणींना तोंड दयावे लागते. मुख्य म्हणजे वेळातून वेळ काढणे, वारंवार स्वत:चाच ड्राफ्ट वाचणे अशा अनेक बाबी पार पाडतांना माझी पत्नी सौ. रेखा, ही नेहमीच मला सहकार्य करते.

मुलगी मृदुला वर्धेला राहून सुध्दा वारंवार लिहिण्याला उत्साहित करीत असते. मुलगा आशय हा तर सध्या विदेशात असला तरी मलाच 'रोल मॉडेल' मानत आला आहे. त्याचा विनयशीलपणा नेहमीच मला प्रोत्साहीत करीत असतो. माझे जावई हे व्यवसायात मग्न असतात पण ते माझे लेख नेहमीच वेळ मिळाला की वाचत असतात. याशिवाय ईतर बरेच नातेवाईक जसे की, संजयराव सांगोले, काही मित्रमंडळी विशेषत: श्याम कारंजकर हे नेहमीच लिखाण करण्यास प्रोत्साहित करतात. या सर्वांच्या शुभेच्छा माझ्या पाठीशी असतात. तेंव्हाच अशी पुस्तके लिहिण्याचे कार्य घडत जाते. या सर्वात महत्वाचे म्हणजे निसर्गाची साथ. माझे आरोग्यच जर चांगले राहले नाहीतर मी काय लिहू शकणार? जीवनात खूप काही फॅक्टर्स असतात. त्या प्रत्येक बाबीचा उल्लेख करण्यासाठी शब्दसंग्रह अपूरा पडतो. मी जीवनात भरपूर वाचन करीत आलो आहे. त्या सर्व मराठी व ईग्रजी लेखकांचाही मी खूपच आभारी आहे. कारण ते कसे लिहितात हे मी आवर्जून निरीक्षण करीत असतो. व मला लिहिण्याची प्रेरणा मिळत असते. मला प्रसिध्दीची हाव नाही पण जेंव्हा मला प्रतिलीपीवर लिहितांना वाचकांचा प्रचंड प्रतिसाद मिळतो तेंव्हा मात्र माझा लिखाण उत्साह नेहमीच व्दिगुणीत होत आला आहे.

मी माझे स्वकथन लिहिण्याचा प्रयत्न माझे ज्ञानानुसार केला आहे. तो कितपत यशस्वी होतो हे मी वाचकांवरच सोपवतो. शक्यतोवर कोणतेही पुस्तक वाचतांना ते वाचकांना कंटाळवाणे होवू नये यासाठी मी नेहमी तत्पर असतो. त्यामुळेच मी काही जीवनातील प्रसंग हुबेहूब तसेच वर्णन केले आहे. त्यातील काही रोमँटीक प्रसंग जसे की, माझ्या जीवनात आलेल्या मुली वगैरे हे केवळ वाचकांच्या मनोरंजनासाठी लिहिलेआहेत.

शेवटी सर्वात महत्वाचा घटक असतो तो म्हणजे वाचकवर्ग. हा जर अस्तित्वात नसता तर कोणीच लेखक झाला नसता. त्यामुळे त्यांचे मन:पूर्वक आधीच आभार मानतो. व माझे हे संक्षिप्त शब्द संपुष्टात आणतो. वाचा बरं कां मंडळी नक्कीच . हे पुस्तक तुम्हाला यत्किंचीतही कंटाळवाणे वाटणार नाही याची मी ग्वाही देतो. आपल्या प्रेरणेनेच मला पुढे लिहिण्याची संधी प्राप्त होत जावो हीच ईश्वरचरणी प्रार्थना करून मी हे 'लिहिण्यापूर्वी थोडसं'...येथे संपवतो आहे.

धन्यवाद!

प्रकाश राऊत,हल्ली मु. अमरावती

# CONTENTS

1. चपला जोडे- विनोदी कथा
2. चार आण्याची उधारी..
3. हसण्याची कला.
4. संशयी बायका
5. व्यक्ति आणि प्रवृत्ती
6. वेदनालय- विनोदी अनुभव कथा
7. वृध्दाची हूशारी
8. मुलीच्या पाहणीचं रहस्य
9. मृत्युची तारीख भयकथा (अध्यात्मिक)
10. मृत्युची भिती....वैचारीक लेख अध्यात्मिक
11. मृत्युची भिती....वैचारीक लेख अध्यात्मिक
12. मृत्यू आणि कर्ज- धक्कादायक कथा- काल्पनिक
13. मृत्यूचा अनुभव- वैचारिक लेख- विज्ञान कथा- Psycological Thriller Story
14. मुलांचा मोबाईल- बालसाहित्यकथा
15. मुन्शींचा पेन- बालसाहित्यकथा- लोककथा
16. माणूस आणि वाघ- बालसाहित्यकथा- लोककथा
17. माणूस आणि कावळा .... बालसाहित्य कथा
18. राक्षसीचा त्याग- बालसाहित्यकथा- लोककथा
19. राजपुत्र- बालसाहित्यकथा- जादूच्या गोष्टी
20. राजपुत्र- बालसाहित्यकथा- जादूच्या गोष्टी
21. लहरी राजा – लोक कथा- बालसाहित्य
22. विचित्र भावंड- बालसाहित्यकथा-फँटसी-
23. मांजरीचे नांव- बालसाहित्यकथा
24. साधू आणि पोपट- बालसाहित्यकथा
25. आगळा अनुभव- विनोदी मर्मकथा
26. हत्ती आणि किडे- बिहारी लोककथा- बालसाहित्यकथा

27. फुलपाखरू – बालसाहित्य कथा- फँटसी कथा
28. जादूचे अंतरंग- ग्रंथ समिक्षण- कथा
29. बाईशी बोलणं........मर्मभेदक विनोदी व व्यंगकथा
30. प्रदर्शन- उत्साहवर्धक विनोदी कथा- काल्पनिक

## 1.चपला जोडे- विनोदी कथा- सामाजिक अनुभव कथा- काल्पनिक

'चपला जोडे' हा विषय अनादी काळापासून प्रचलित आहे. त्या काळात पायात घालणा-या वाहनांना 'खडावू' असे म्हणत असत. त्या काळात खडावू किंवा पादत्राणे यांना अतिशय पूज्य मानल्या जात असे. सर्व लोकं त्या काळात पूजनीयच होते असे थोडक्यात म्हटल्यास काय वावगे आहे. आजकाल मात्र लोकांना तेवढे सभ्य मानणे ही काळाची चूक ठरू शकते. या चपला जोडयाचा विषय निघाला की, प्रत्येक जण आपली कहाणी सांगायला सुरूवात करतो. अशीच गंमत आज मलाही सांगायची ईच्छा झाली.

मी गरीबीतून शिकलेला एक सामान्य माणूस आहे. मी नेहमी स्वस्त चप्पल घेत असे. एकदा मी बाजारात गेलो. साधारणच दुकान पाहले तरी तो दुकानदार अतिशय शिष्ट वाटत होता. मला बोलला...' या भाऊ, काय पाहिजे?

" मला गहू, तांदूळ पाहिजे होते. तो माझ्याकडे खालून वरपर्यंत अशा रितीने पाहत होता की, मी एखादया खेडयातून तर आलो नाही. तो ओरडून म्हणाला.....'अहो भाऊ, हे काय किराणा दुकान आहे काय. अहो येथे चपला आणि जोडे मिळतात.

'मग तुम्ही मला कसे विचारले की, काय पाहिजे. हे मलाही माहित आहे की हे चपलांचे दुकान आहे. तेंव्हा मला चप्पल किंवा जोडाच पाहिजे असणार नां...

'बरं बरं ठिक आहे बसा.....कशी दाखवू...चांगली की साधारण....

'साधारणच दाखवा  नां....

कां बरं , पैशाची अडचण आहे काय?

'अडचण नाही, पण भविष्यासाठी पैसे हवेत म्हणून साधारणच चप्पल पाहिजे.

त्याने मला एक साधारण 130 रूपयापर्यंतची चप्पल दाखवली. त्यावेळी मी साहेब वगैरे झालो नव्हतो त्यामुळे त्याने म्हटलेला भाऊ हा शब्द मला खूप आदरजण्य वाटला. ती चप्पल घेवून मी मिरवायला लागलो. पण काही दिवस लंगडत असल्याने माझ्या मित्रांनी उगीच पृच्छा केली.

‘काऽरे, कां बरं लंगडतो आहे…

‘आऽरे तसं काही नाही….ही चप्पल जरा नवीन असल्यामुळे थोडीशी पायाला चावत आहे. या विषयावर माझ्या मित्रांनी खूप संशोधन केले आहे अशा आविर्भावात भरपूर चर्चा केली मला एक उपाय सांगितला. म्हणे दुस-या एका चामडयाचे पाणी करून ते पायाला लावावे म्हणजे चप्पल चावत नाही. आता चामडयाचे पाणी उगाळून कसे करावे याचे दिव्य ज्ञान मला नसल्यामुळे मी ही संशोधीत बाब बाजूला सारून चप्पलला माझ्या पायासाठी पाळीव कसे करता येईल याचा सराव करीत होतो.

अशातच एक प्रसंग उदभवला. मला अकोला येथे मित्राकडे जायचे होते. दिवस भर उन्हाळयाचे होते. अकोला आधीच गरम. माझ्या चपलेचा तळवा जरा जाडाच होता. त्यातही माझा एक काटकसरी मित्र म्हणाला होता की, चप्पल घेतल्याबरोबर त्याला ‘नाल’ लावावी. नाल हा शब्द आजकालच्या पिढीला समजणार नाही म्हणून मी सांगतो. नाल म्हणजे चप्पल झिजू नये यासाठी त्याकाळात लोखंडाचा यु आकाराचा एक तुकडा चप्पलला बसविण्याची पध्दत होती. त्या मित्राचे बहूमूल्य सजेशन घेवून मी एक नाल माझ्या चपलेला बसविली. आता झाले काय की, चप्पल आहे त्यापेक्षा जरा जडच झाली. त्यामुळे चालायला अजूनच अडचण जाणवत होती. तशातही असा अकोला जाण्याचा प्रसंग आला.

ऐन दुपारची वेळ. उन्ह डोक्यावर तापत होते. मी ती जड चप्पल घालून मित्राकडे गेलो. मित्र सुभाष घरातच होतो पण त्याने लवकर दार उघडले नाही. उन लागू नये म्हणून मी त्याचे घराची एक पायरी चढायचा प्रयत्न केला. छज्जाची सावली मिळेल असे मला वाटले. पण दुपारची सनकणारी उन मला कशाला सावली देते उलट मी पायरीवर पाय दिल्याबरोबर माझा पाय त्या संशोधीत नालमुळे घसरला. एकदम पाय दुमटला. पायाला गंभीर लचक बसली होती. उन्हात बसता येत नव्हते कारण चटके बसत होते आणि उभेही राहता येत नव्हते कारण पाय लचकल होता. थोडयावेळाने पाहतो तर मित्राचे घर आतून लॉक केलेले आढळले व तो मागील दारातून गावला गेल्याचा शोध मला लागला.

एकशे तीस रूपयाच्या चपलेत पायाचा दवाखान्याचा खर्च तब्बल चारशे रूपये आला. तेंव्हापासून मी ब्रँडेड चप्पल वापरायला लागलो. सांगण्याचे तात्पर्य नको त्या ठिकाणी माणसाने पैसे वाचविण्याचा प्रयत्न करू नये, हेच मला या कथेतून सांगायचे होते.

*******************************

## चपला जोडे- विनोदी कथा- भाग 2

मागच्या भागात, मी गरीबीमुळे साधारण चप्पल वापरत असतांना, माझ्या पायाला कशी लचक बसली व मला चप्पलच्या स्वस्त किंमतीने कसा दगा देवून, मला दवाखाण्याचा किती जास्त खर्च आणला ते आपण पाहले आहे.

आता या भागात, माझे तंत्रनिकेतनातील ‘स्थापत्य अभियांत्रिकीचा पदविका’ अभ्यासक्रम पूर्ण झाल्यानंतर, माझा या विषयाचा अधिक अनुभव मी तुम्हास कथन करतो. मी तोतलाडोह प्रकल्पावर अभियंता म्हणून रूजू झालो तेंव्हा साधी चप्पलच वापरत होतो. आता मात्र मी साहेब झालो व निर्णय घेतला की आता साधारण चप्पल वापरायची नाही. मी नागपूरला गेलो व एक बाटा कंपनीची चांगली महागडी चप्पल घेतली. अर्थात त्या चप्पलचा मला अतिशयच आनंद होत होता. पण म्हणतात नां की, आनंदाचे क्षण फार काळ टिकत नसतात. नेमके तेच झाले.

मला एक तेरवीचे निमंत्रण आले. तेरवी साधारणपणे टाऊन प्लेसला होती. चपला अशा प्रंसगी चोरीला जातात हे मी केवळ ऐकूनच होतो. तरीसुध्दा सावधगिरी बाळगणे हे माझे आदयकर्तव्य होते असे मला वाटले. मी त्या प्रंसगात उपस्थित होतो. काही सभ्य मंडळीनी माझ्या त्या नव्या को-या चप्पलची तोंडभरून स्तुति केली. त्यातील एक सदगृहस्थ मला म्हणाला......’साहेब तुमची चप्पल फारच नवी कोरी दिसते हो...तुम्ही असं करा....की याला एका कोप-यात सुरक्षीत जागी ठेवा म्हणजे ती चोरी जाणार नाही, कारण आमच्या गावात अशा तेरवीच्या कार्यक्रमात हमखास चप्पल चोरीला जाते. मी त्याची शिरसावंदय आज्ञा पाळून काहीतरी युक्ति योजावी असे क्षणभरात ठरविले. माझ्या चाणाक्ष बुध्दीचा वापर करावा असे मनोमन ठरविले. मला माझ्या सुपिक डोक्यात लगेच एक आयडिया आली. मला वाटले जर चपप्ल चोरीच होत असेल तर ही चप्पल कां लेडिज चप्पलमध्ये नेवून ठेवू नये. तेथे एक तर

माझ्या पायाची चप्पल कोण्या बाईला होणार नाही. व झाली तरीही माणसाची चप्पल बाई थोडीच चोरणार आहे. मी माझ्या आयडियावर ईतका खूष होतो की, क्षणभर मला वाटले की, माझ्यासारखा हूशार प्राणी या जगात निर्माणच होवू शकत नाही.

मी अगदी बिनधास्त जेवायला गेलो. चप्पल चोरीला जाईल याची यत्किंचीतही शंका मला आली नाही. जेवल्यानंतर पाहतो तर काय अहो आश्चर्यम्...नेमकी माझीच चप्पल चोरीला गेलेली मला आढळली. आता काय....'आलिया भोगासी असावे सादर'...अर्थात माझा चेहरा असा काही पडला की जणूकाही माझ्याच जवळच्या नातेवाईकाचा मृत्यू झाला आहे. हे पाहल्यानंतर लोकांनी माझे खूप सांत्वन केले. काहीजण तर म्हणाले की, असे घडणे अतिशय शुभ असते. आपल्या मागची ब्याद किंवा भविष्यात येणारे संकट अशा चोरीमुळे टळत असते. आपली ईडा पिडा टळत असते. लगेच मी अनवाणी पायाने जवळचे दुकान गाठले व पूर्व परिस्थीतिच्या अनुभवानुसार एक साधारण स्लीपर घेवून तो दिवस तात्पुरता पार पाडला. एकजण तर मला म्हणाला की...'काळजी करू नका साहेब, अहो तुमच्या सारख्या साहेब लोकांची चप्पल जाणार नाही तरआमच्या सारख्याच्या चामडयाच्या 'वाहयना' कोणी चोरणार आहेत काय.... मला त्याचेही बोलणे अगदी प्रंसगाला साजेशेच वाटले. यानंतर मी यापेक्षाही जास्त काळजी घेण्याचे मनोमन ठरविले व तेथून लगेच खसकलो.

******

## चपला जोडे भाग 3- विनोदी कथा-

पाहता पाहता हा 'चपला जोडे' सारखा क्षुल्लक विषय भाग तीनवर चालला आहे. अनुभवच माणसाला बरेच काही शिकवून जातो, हेच मला सांगायचे आहे.

मी 'ब्रँडेड चप्पल' घेतल्यानंतर ती सुध्दा चोरीला जावून जीवनात पैशाची नासाडी होवू शकते, हे मागील भागात आपण पाहले. आता परत दर्जेदारच चप्पल घ्यावी पण जरा स्वस्त घ्यावी अशा विचाराने मी आता पॅरॉगॉन ही प्रचलीत चप्पल घेण्याचे ठरविले. याची किंमत केवळ 340/- होती. मी ती घेतली. माझा पायाचा नंबर हा केवळ सहा आहे. हा क्रमांक सर्व सामान्याचा असतो याची मला चप्पल घेतेवेळी कल्पना आली नाही. तसेच ही चप्पल स्वस्त

प्रकारात पण ब्रँडेड प्रकारात मोडत असल्याने प्रत्येक जण ही चप्पल आजकाल घेवू लागला आहे. तशी ती टिकावू पण आहे.

एकदा एका प्रंसगात मी ही ‘कथीत चप्पल’ घालून गेलो. तेथे मला जवळपास माझ्याच नंबरच्या चार चपला आढळल्या. मला जरा गोंधळल्यासारखे झाले. शिवाय कलर सुध्दा सारखाच दिसला. होतं काय की, कोणत्याही प्रंसगाला येणारे बरेच तरूण महाभाग हे जोडे घालून येतात. त्यांना मध्येच लघुशंका लागली की, ते सर्रासपणे दुस-याची चप्पल घालून जातात हा अनुभव आपण पण घेतला असेलच. आणि ज्यावेळी हे लोकं दुस-याची चप्पल घालून जातात तेंव्हाच पाहूण्यांना बाहेर जायचे असते. हा योग तंतोतंत जुळून कां व कसा येतो याचे आकलन आजपर्यंत मला झालेले नाही. पण असे घडते हे मी तुम्हास खात्रीपूर्वक सांगू ईच्छितो.

हाच प्रंसग आता माझ्या जीवनात घडला. माझी चप्पलच तेवढी बाहेर कोणीतरी जोडा घालणा-या तरूणाने, घालून गेली असावी, असा अंदाज व तर्क, उपस्थित पाहूण्यांपैकी कोणीतरी मांडला. मी क्षणभर चप्पल मिळेलच या सुखाच्या अपेक्षेत प्रतिक्षा करीत बसलो पण माझा लवकरच अपेक्षाभंग झाला. माझीच चप्पल घालून गेलेला व्यक्ति परत आलाच नाही. मला वाटले, बोललेला शब्द व सुटलेला बाण कधीच परत येणारा नसतो. त्यामुळे मी मुकाटयाने चप्पलविरहीत पायाने जवळच्या  बाजारात गेलो आणि या प्रंसगाला हसतखेळत तोंड दिले.

माझी बायको म्हणाली की, तुम्ही यानंतर दोन साध्या चपला जवळ बाळगत चला. म्हणजे थोडक्यात ‘चप्पल स्टेपनी’ माणसाजवळ असावी, असे तीचे बहुमूल्य मार्गदर्शन याप्रंसगी मला लाभले. आता मी ते फॉलो करीत असतो व माझ्या कारमध्ये मी नेहमी एक दुसरी चप्पल ठेवत असतो. पण तेंव्हापासून माझी एकदाही चप्पल चोरीला गेली नाही. म्हणूनच मी सर्वांना म्हणतो की, सर्वांनी एल.आय.सी. काढावी. आता तुम्हाला प्रश्न पडला असेल की, चप्पलचा आणि एल.आय.सी.चा काय संबंध. संबंध आहे....जोपर्यंत तुम्ही विमा काढत नाही तोपर्यंत मरण येण्याची शक्यता जास्त असते. एकदा कां तुम्ही एल.आय.सी. काढली की, मग तुम्हाला कधीच मरण येत नाही. जोपर्यंत ती एल.आय.सी. मॅच्युअर्ड होत नाही. हा विनोद नाही. हा माझा अनुभव आहे. माझ्या आजपर्यंत दोन पॉलीसीच मॅच्युअर्ड झाल्या आहेत. मी पण मी अजूनही तुमच्या मनोरंजनासाठी हयात आहे. पण एक गोष्ट निश्चित की, मी जरी हयात असलो तरी मला पेन्शन उचलण्यासाठी दरवर्षी मी ह यात असल्याचा पुरावा शासनाला दयावा लागतो.

पुढील भागात मी माझ्या साहेबांच्या चप्पलाची गंमत तुम्हास सांगणार आहे तेंव्हा आपण जर आवडीने हे हसत खेळत लिखाण वाचत असाल तर ईतरांना ही वाचण्यास प्रेरणा दयावी किंवा माझी ही विनोदी लेखमाला वितरीत करावी, याच अपेक्षेत हा भाग मी येथे संपुष्टात आणतो.

## चपला जोडे भाग 4- विनोदी अनुभव कथा-काल्पनिक

आता माझी चप्पल चोरी जातेच हे मी गृहीत धरले होते. तरी कोणाच्याही घरी काही कारणास्तव जाणे, हे थोडीच बंद होणार असते. जनसमुदायात राहायचे म्हटल्यास व समाजाला टाळणे, हे उचित नाही असे मानले तर, पुन्हा पुन्हा अशा गोष्टींची पुनरावृत्ती ही होणारच.

अमरावतीलाच एका लग्नप्रसंगात जायचे होते. कार्यालयात त्यावेळी मी व माझे साहेब होतो. अर्थात या प्रंसगात साहेबांनाही निमंत्रण होते हे वेगळे सांगायला नको. माझ्या साहेबांनी नुकतीच नवीन चप्पल घेतली होती. तीला फार तर चार पाच दिवस झाले असतील. साहेब मला म्हणाले, ‘आपल्याला जायला पाहिजे.’.... त्यावर मी म्हणालो,’साहेब आपण नक्कीच जावू पण एक प्रॉब्लेम आहे.

‘अहो मी तुमच्यासोबत असल्यावर काय प्रॉब्लेम आहे, तुम्हाला अर्धी सुट्टी टाकण्याचा काही प्रश्नच उरत नाही’

‘तसं नाही, मी सुट्टीचा विचार करीत नाही. मला तुमची फार काळजी वाटते.’

‘ अहो, कशाची काळजी?

मला वाटते, तुमची  चप्पल नवीन असल्यामुळे तुम्ही ती, या लग्नात.. पायाच्या बाहेर काढूच नका. मला चपला चोरी जाण्याचा खूप अनुभव आहे. आम्ही ज्या लग्नात गेलो तेथे एक वेगळेच दृश्य दिसले. सर्वांनी चपला बाहेरच काढल्या होत्या. आम्हालाही तसे अनुकरण करावे लागले. तरी मी काळजीपोटी साहेबांना एक बहुमूल्य असा सल्ला दिला. साहेब तुम्ही एक चप्पल एका बाजूला व दुसरी चप्पल दुस-या टोकावर ठेवा. हे त्यांना पटले व त्यांनी तसे केले. आता चप्पल चोरी जाण्याची शक्यता नव्व्यान्नव टक्के सुरक्षित होती असे आम्हा दोघांनाही वाटले त्यामुळे

आम्ही अगदी बिनधास्त होतो. प्रसंग आटोपला. जेवण झालीत. आणि परत बाहेर निघावयास पडलो. तर काय आश्चर्य की, माझ्या साहेबांची चप्पल दूर दोन टोकावर ठेवूनही चोरीला गेली. आता मात्र कहरच झाला. माझी आयडिया व्यर्थ ठरली याचे मला क्षणभर दु:ख झाले. मनोमन मला वाटले आपणच दुर्भागी आहोत. कदाचीत मी साहेबांसोबत नसतो तर हा प्रसंग टळला असता.

माझ्या मनातील 'नकारात्मक भावना' नेहमी अशी दुषीत रित्या फलद्दप कां होते याचा मला आजतागायत शोध लागला नाही. मला वाटले की, आपण जेवढी सुरक्षितता निर्माण करतो तेवढया जास्त आयडिया चोरांच्या मनात येत असतात. जसे की, दाराला बाहेरून पक्के कुलूप लावले तर चोर हा  मागून घर फोडतो. मागूनही ग्रील बसविली तर हा चक्क भिंती फोडतो. आता काय चपलांना कुलूपे लावून ठेवावीत. असा हा चप्पल पुराण विषयाचा चवथा भाग या ठिकाणी संपुष्टात आणतो.

*******************

## चपला जोडे- भाग 5- विनोदी कथा

चपला जाणे हे नित्याचे आहे. व हा नियम सर्वांसाठी लागू आहे. असे लक्षात घेवून अनेक जणांनी 'सभ्य अशा आयडिया' मला आतापर्यंत सुचविल्या होत्या पण काही असभ्य अशा आयडिया सुध्दा असू शकतात हे माझे ध्यानात केंव्हाच आले नाही. असाही एक प्रसंग मी आता सांगणार आहे.

एकदा माझ्या एका कंजूष मित्राची चप्पल चोरीला गेली. ही बाब त्याने मला सांगितल्याबरोबर मी हळहळ व्यक्त केली. माझी हळहळ पाहून तो म्हणाला..'ईतके दु:ख कां बरे मानतो आहेस..... मी म्हटले... आऽरे, असे प्रसंग माझ्यावर पण अनेकदा आले आहे त्यावेळी माझी फार पंचायत झाली. मला फार धावपळ करावी लागली. तसेच उन्हातान्हात बाजारात अनवाणी पायाने जावे लागले. बाहेरून लोकांना, माझ्यासारख्या सुशिक्षितांनी अनवाणी पायाने

चालावे, हे बघून काहींनी माझी चेष्टा पण केली......’काय साहेब, एवढी काटकसर कशाला करता...एखादी महागडी नाहीतर साधी चप्पल घ्यावी पण असे अनवाणी पायाने या काळात तरी चालू नये. मी अगदी स्तब्ध झालो व माझ्यावर आलेला प्रंसग मी कोणासही सांगत नसे. तसे अनोळखी माणसास सांगून तरी काय उपयोग.

मित्र बोलला..’ मूर्ख आहेस तू! आऽरे अशावेळी आपली चप्पल गेली की , या बाबीचा गवगवा न करता चुपचाप आपणही, ‘दुस-याची नवीन चप्पल’ पायात घालून आणावी.

बापऽरे..मला अशा असभ्य आयडिया कधीच माझे डोक्यात आजतागायत आल्या नव्हत्या. हा तर सभ्यपणाचा कळसच झाला. तो बोलला...आऽरे , जे आपली चोरतात त्यांना लाजा नाहीत तर मग आपणही एखादयाची गुपचुप चोरल्यास त्यात काय वावगे आहे.

मी बोललो...’नाही रे....’.हे मला अजिबातच रूचत नाही.’

“मग राहू दे.... तू लेखक माणूस... तूला कसं रूचणार....तू तर असा आहेस की ,मी ही तुला जी ‘गुप्त आयडिया’ सांगितली त्यावर ही एखादी कथा लिहिणार आहेस.

मी बोललो....ही गुप्त नाही, ‘असभ्य आयडिया’ आहे. आपण साहेब प्रकारात मोडतो.

“म्हणूनच तर मी म्हणतो आहे.... आरे साहेब लोकांवर कोणीच शंका घेत नसते. कारण आपले कपडे वगैरे अतिशय भारी दिसत असतात.

या भारी कपडयावरून अजून एक गोष्ट आठवली. एकदा मी नागपूरला दूरच्या नातेवाईकाच्या लग्नसमारंभास गेलो. अर्थात तेथे माझे फारसे कोणी ओळखीचे नव्हते. माझ्याकडे एक खेडयातला माणूस एकसारखा पहात होता. पाहता पाहता त्याचा संयम सुटला व तात्काळ माझे जवळ आला व मला बोलला...”आपण साहेबासारखे दिसता पण मला आपली ओळख पटली नाही. .....मी त्याचे कानाजवळ जावून सांगितले की, मी दूरचा नातेवाईक आहे. मी राऊत गुरूजींचा पोरगा आहे. त्यांचे नागपूरला येणे वृध्दावस्थेमुळे जमणार नव्हते म्हणून मी त्यांचे वतीने आलो आहे. हे स्पष्टीकरण त्यास पुरेसे पटले नाही असे त्याचे चेह-याच्या एकंदरीत हावभावावरून मला वाटले. मला या बाबीशी काही घेणेदेणे नव्हते. केवळ जेवण करून लगेच प्रकल्पावर अतिशय महत्वाच्या कामासाठी जायचे होते. तो माणूस माझ्याकडे एकसारखा

जेवतांना पाहात होता. माझे जेवण आटोपल्यावर तो बोलला....'साहेब , व्यवस्थित जेवण झाले नां!' मी बोललो....'होऽहो, अगदी व्यवस्थित झाले.

जातांना तो मला एक टोमणा मारूनच गेला व म्हणाला...आजकाल बरेच सुशिक्षित माणसे लग्नात मोफतच जेवूण जातात.

मी ही घटना वडिलांना सांगितली तेंव्हा वडील म्हणाले ....."तू टेन्शन घेवू नकोस.... आरे तो "चिंध्या" आहे. तो स्वत: असे प्रत्येक लग्नात करीत असतो कारण तोच फुकटात जेवत असतो पण त्यास वाटते कोणी संशय घेवू नये म्हणून तोच लोकांवर संशय घेत असतो. या स्पष्टीकरणाने माझा जीव भांडयात पडला पण मी शपथच घेतली की, आता यापुढे कधीही दूरच्या नातेवाईकांच्या लग्नात जेवायचे नाही. असो, अशा गंमतीजमती तूमच्याही जीवनात घडत असेल पण तुम्ही लिहायची हिंमत करीत नाही. Any way....तुम्ही मात्र माझ्या अशा गमती आवर्जून वाचत चला. कारण महान तत्वज्ञ 'स्पिनोझा ' म्हणतो ...जीवनात आनंद मिळविणे हा प्रत्येक माणसाचा हक्क आहे व तो आपण मिळविलाच पाहिजे.

*****************

## चपला जोडे भाग 6- विनोदी कथा

आतापर्यंत आपण या चपला जोडयाची कहाणी ऐकूण लोटपोट झाले असालच यात मला शंका नाही. आता मात्र ही चपला संस्कृती कशी बदलत चालली आहे हे मी तुम्हाला या भागात सांगणार आहे.

आता हे सर्वश्रुत आहे की, प्रत्येकाची चप्पल ही कोणत्या ना कोणत्या प्रसंगात चोरीला जाते. मग यावर रामबाण उपाय काय तर आता प्रत्येकाने हे ठरविले आहे की, काहीही झाले तरी चप्पल पायाचे बाहेर काढायची नाही. भलाही ती चप्पल मग गावभर घाणीतून कां फिरून येवो. आता मला असा प्रकार पहायला मिळत आहे.

एकदा मी एका खेडयात तेरवीसाठी जेवायला गेलो. तेथे बुफे जेवणाची व्यवस्था नव्हती. खाली बसून जेवायचे होते. पाहतो तर काय प्रत्येकाच्या पायात चप्पल घालून ते लोकं जेवायला बसले होते. काहींनी तर पायात त्यांचे जोडे घातले होते. जोडयाच्या बाबतीत एक गोष्ट तुम्हास

चांगलीच ठावूक असेल की, जोडे घालणारे महाभाग हे जोडयाच्या आंत मोजे घालतात. माझ्या अंदाजानुसार सुमारे नव्वद टक्के लोकं त्यांच्या पायातील मोजे धुण्याची तसदी घेत नाही. त्यामुळे त्यांच्या पायातील मोज्याचा अत्यंत घाणेरडा वास येत असतो. तो वास हा जेवणातील स्वादिष्ट पदार्थाच्या सुगंधापुढे जिकंत असतो. आता होते काय की, जेवायला बसलेल्यापैकी काहींच्या मोज्याचा वास एवढा तीव्र गतीने पसरतो की , जेवण करणे मुश्किल होवून जाते. हा वास नेमका कोण्याच्या मोज्याचा आहे, ही त्यावेळी म्हणजे जेवणाचे वेळी नक्कीच संशोधनाची बाब नसते. मग कसेतरी जेवण आटोपून हा प्रसंग निभवावा लागतो.

पण हे तर काहीच नाही.......आता पुढील प्रसंग जरा बीभत्स स्वरूपाचा आहे तेंव्हा ज्यांना हे वाचणे सहन होत नसेल त्यांनी कृपया वाचू नये. कारण तुमच्यावर जर काही सायकालॉजीकल इफेक्ट झाला तर मी जबाबदार नाही. हसा जरूर..... “पण तब्येत खराब करून घेवू नका.”

कोण्या एका प्रसंगी काय झाले की, अशीच एक बैठी पंगत भरली होती. अर्थात त्या पंगतीत मी नव्हतो पण ही गोष्ट मला एका खेडयातल्या माणसाने सांगितली. साहेब ,हे तर काहीच नाही. आहो आमच्या गावात अशीच एक पंगत बसली होती. सर्व लोकं तुम्ही म्हणता त्याप्रमाणे चपला जोडे घालून जेवायला बसले होते. पंगत सुरूही व्हायची होती आणि अत्यंत घाण वास सुटायला लागला. त्यावर संशोधकांनी, तो शेणाचा असावा किंवा कोणाच्या तरी जोडयाला शेण लागले असावे असा अंदाज बांधला. पण वासाची तीव्रता लक्षात घेता, काहींनी तो नेमका कशाचा आहे याचा शोध लावला. तो बीभत्स प्रसंग मी फार काही वर्णन करीत नाही पण एकंदरीत असेही प्रकार या चपला जोडयाच्या असभ्य वर्तनामुळे घडतात, एवढेच काय ते मला या भागात सांगायचे होते.

आता पुढील भागात मला वेळ मिळाल्यास, मी बायकांच्या चपलांच्या गमती घेवून तुम्हाला भेटणार आहेच तोपर्यंत ही विनोदी कथामाला आपण वाचत रहा व हं जराही स्मित तुमच्या चेह-यावर आले असेल तर मला प्रोत्साहन म्हणून नक्कीच पाच स्टार दया किंवा 2,5,10 चे स्टीकर देवून प्रोत्हाहीत करावे एवढीच काय ती लेखकाची अपेक्षा असते. यापेक्षा जीवनात आणि काय हवं!

## चपला जोडे भाग 7- विनोदी कथा

'चपला जोडे' हा क्षुल्लक विषय वाटत असला तरी त्यात गंमती असतात, हे आता मी तुम्हास सिध्द करून दाखवले की नाही. माझ्या पहिल्याच भागाला अतिशय प्रतिसाद मिळाल्यामुळे माझा लिखाणाच व कल्पकतेचा उत्साह द्विगुणीत झाला आहे.

चला तर मग या भागात काही बायकांच्या चपलाच्या गंमती आपण बघू. बायकांच्या चपलांमध्ये खूप प्रकारच्या डिझाईन्स असतात. त्या जेंव्हा दुकानात जातात तेंव्हा तो दुकानदारही त्यांना विविध प्रकारच्या चपला दाखवून फार परेशान झालेला असतो पण काय करणार शेवटी धंदा मग कोणताही असो त्यात संयम हा असायलाच हवा. बायका या चपला घेण्याचे बाबतीत फार संयमी व संभ्रमी असतात. त्या स्वत:ही कन्फ्युझ्ड व दुस-यालाही पेचात पाडतात. तसेच त्या चौकसही असतात. आमच्या शेजारी एक बाई तर अशी आहे की, माझ्या बायकोने कोणतीही वस्तू आणली की, तीच वस्तू तिला बाजारातून आणल्याशिवाय करमत नाही.

जीवनात माझ्या चपला अनेकदा चोरीला गेल्या आहेत. हा प्रचंड दांडगा अनुभव माझे पाठीशी असल्यामुळे मी माझ्या बायकोला एक नाही तर चार पाच चपलांचे जोड घेवून दिले. त्यापैकी एक चप्पल माझ्या शेजारच्या बाईला आवडली. ती तात्काळ, माझ्या बायकोने सांगितलेल्या दुकानातच गेली. माझ्या बायकोच्या चप्पलचा मोबाईलवर फोटो काढून नेण्यास ती विसरली नव्हती. दुकानात गेल्यावर अशीच चप्पल पाहिजे असा आग्रह ती दुकानदाराला करू लागली. दुकानदाराने तशीच चप्पल दाखवली. अर्थात प्रथम एक चप्पल सॅम्पल म्हणून दाखवली व किंमत सांगितली. ती म्हणाली.....'सेठजी तुम्ही, या अगोदर तर काल आलेल्या बाईला एवढया किंमतीत दोन चपला दिल्या आणि आज मला एकाच चप्पलची किंमत तेवढी सांगत आहात'......... तो बिचारा हिची बुध्दीची तीव्रता पाहून हैराण झाला. आणि म्हणाला.....'अहो, मॅडम, आपण पदवीधर आहात काय?'

“आऽरे आपण, मी पदवीधर असल्याचे कसे ओळखले.”

“काही नाही, सहजच मला वाटले की आपण पदवीधर आहातच, कारण आपण, मी सांगितलेली किंमत एकाच चप्पलची गृहीत धरली म्हणून...

“म्हणजे काय , मला मूर्ख समजता की काय? तुम्ही दाखवतांना दोन दाखवून किंमत सांगायची नां!...........तो अगदी विन्मुख झाला. व म्हणाला....”माफ करा मला, मीच चुकलो असेन.

तो अविवाहीत असल्याने त्याला याची कल्पला आली नाही की, बायका अशा चुकांना कधीच माफ करीत नसतात. ठरल्यानुसार तिला खूप राग आला व तडक ती दुकानाच्या बाहेर गेली. बिचा-या दुकानदाराचे नको त्या बोलण्याने नुकसान झाले.

बायकांचे एक वैशिष्ट्य मला फार आवडते. ते म्हणजे माणसासारखे त्यांचेकडे चप्पलचा एकच जोड नसतो. तर नव-याने घेवून दिलेली एक व नव-याला माहित नसतांना घेतलेली एक असे किमान दोन जोड तरी असतातच. याबाबतीतच काय पण बाकीही काही बायका दुस-अनेक बाबतीत लक्की असतात. तुम्हीच बघा ना! तुम्ही कोणत्याही प्रंसगात जा. कोणाची तेरवी असो की कोणाचे लग्न किंवा वाढदिवस असो त्यांना किमान ब्लाऊज पीस किंवा साडी मिळते पण याउलट माणसांना कोणी साधी बनियन सुध्दा देत नाही. मग कपडयाचा तर प्रश्न दूरच राहतो. त्यामुळे त्यांची अवस्था नेहमी संभ्रमीत असते. एका बाईला मी सहज लेखक या नात्याने एक प्रश्न विचारला की, ..’तुमच्या कडे एकूण किती साडया आहेत. मला ईमानदारीने सांगा.’

ती म्हणाली....’भावोजी, अहो, माझ्याकडे एकंदर पन्नास साडया आहेत पण वेळेवर एकही साडी घालण्यासारखी वाटत नाही.’

‘कां बरं.....!’

कारण की, बायकांच्याच कपडयामध्ये खूप व्हेरायट्या असतात.

‘बरं मग, मला सांगा ...तुमच्या तुलनेत तुमच्या नव-याजवळ किती ड्रेस असतील..?

‘असतील, त्यांचेजवळ चार पांच....पण ते रोज नवीन घालत नाहीत नां....एकच पँट पंधरा दिवस धोपटतात व फक्त प्रंसगाला तेवढे शर्टच काय ते बदलवतात. आमच्या बायकांचे तसे नसते.

पुरूषांचे काय शर्टाखाली पँट दबून जातो पण आमची तर पूर्ण साडी ईतरांना दिसते नां! म्हणून आम्हाला एवढया सा-या साडया हव्या असतात. शिवाय आम्ही रोज साडी बदलवतो की नाही.

हे लॉजिक एकूण मी, मला खात्री पटली की, बायका हया पुरूषांच्या तुलनेत खूप हूशार असतात. म्हणूनच तर त्या नव-याला ताब्यात ठेवण्यात तरबेच असतात.

खूप चपला असलेल्या बायका ईतक्या हूशार असतात की, कोठे कशी चप्पल घालावी हे त्यांचे ठरलेले असते. तेरवीला जुनी पुराणी चप्पल तर प्रसंगाला साधारण, उच्चभ्रुकडे जातांना नेमकी महागडी चप्पल तर फिरायला जातांना ज्युती वगैरे...वगैरे...ज्युतीवरून जोडयाची गंमत घेवून मी पुढील भागात अर्थात मला वेळ मिळाल्यास तुम्हाला भेटेनच..तोपर्यंत तुम्ही अशा त-हेने जीवनाचा आनंद घेत रहा. चांगल्या वाईट प्रतिक्रीया देण्यास विसरू नका बरं कां!

## चपला जोडे भाग 8- विनोदी कथा

मी माझ्या बायकोला नेहमी चार जोड तरी घेवून दिलेले आहे. त्यातील दोन जोड ती नेहमीच बाहेर ठेवते. एकदा तर एक गंमतच झाली. मला तिला घेवून तातडीने एका मित्राकडे जायचे होते. तेथे पाहोचलो. चहा पाणी झाले. परत यायच्या वेळी तिला असे आढळले की, तिने एका पायात निराळीच तर दुस-या पायात दुस-याच जोडमधील चप्पल घातली आणि मलाच विचारू लागली की, या दोन्ही चपला माझ्याच आहेत यात शंका नाही पण मी कशी काय अशी चूक केली. एका पायात निराळी, अन् दुस-या पायात निराळी. म्हणजे थोडक्यात असे झाले की, चुका बायका करतात आणि विचार आपल्याला करायला लावतात. Any way...Go ahead..

आता काही जोडयाबाबत गंमती पाहू. मला चप्पल चोरीला जातेच, हा दांडगा अनुभव असल्यामुळे मी आता जोडा वापरायला सुरूवात केली होती. नेहमीची कॉम्प्युटरची संवय आहे त्यामुळे मी एक बाटा कंपनीचा जोडा ऑनलाईन बोलावला. चोवीसशे रूपयाचा जोडा तोही बाटा कंपनीचा केवळ मला कंसेशन रेटमध्ये अठराशे रूपयात मिळणार होता. मला लोभ आणि ईच्छा दोन्हीही अनावर झाल्या आणि मी तो बोलावला. जोडा प्रथम चांगलाच दिसला. काही काळ वापरल्यानंतर मात्र तो तीन महिण्यातच त्याचा तळभाग वरील चामडी सौंदर्यापासून अलग झाला. मला आश्चर्यच वाटले. आता काय करावे. माझ्या दृष्टीने एवढा भारी जोडा फेकून देणे

मला योग्य वाटले नाही. मी एका साधारण रस्त्यावरच्या दुरूस्ती चर्मकाराकडे गेलो व अशा जोडयाची शिलाई करता येईल काय याची विचारणा केल्यावर तो म्हणाला...’साहेब, याची शिलाई होवू शकणार नाही कारण तो पूर्णपणे सुटला आहे. पण तुम्ही एक काम करू शकता, याला नवीनच पूर्ण तळ दोन्ही जोडयांना बसवू शकता. ते काम राजकमल चौकात होवून जाईन. खर्च तेवढा थोडा फार जास्त येईल. मला वाटले फेकून देण्यापेक्षा हा पर्याय काहीसा मला बरा वाटला. मी त्या दुकानात जावून नवीन चांगले स्टँडर्ड तळवे बसवून घेतले. आता मी तो बाहेर फिरायला जातांना वापरत असतो. असे कां झाले असावे हे विचारण्यासाठी मी परत एक दोन दिवसांनी त्या चर्मकाराकडे गेलो. तो म्हणाला..’साहेब, तुम्ही लोक सारं काही ऑनलाईन बोलावता व त्या कंपन्या तुम्हाला दोन वर्षापुर्वीचा माल माथी मारतात. काय असतं की, रबरालाही लवचिकतेची मर्यादा (Expiry) असते. दुकानात मात्र फ्रेश माल असतो. या त्याच्या ज्ञानामुळे मला दिव्य दृष्टी प्राप्त झाली. आता मी दुकानातच खरेदी करायला जात असतो.

मी जेंव्हा तरूण होतो, तेंव्हा माझे वडील जे प्रायमरी शिक्षक होते, ते माझे जुने चपला जोडे हमखास खेडयावर न्यायचे व काही काळ वापरल्यानंतर ते गरीबांना देवून दयायचे. पण गंमत अशी की, त्या कथीत चपलांचा व जोडयांचा अंत पाहल्याशिवाय ते त्यास सोडत नसत. तो काळच गरीबीचा असल्याने निराळाच जाणवत होता. आजकाल कोणत्याही गोष्टीची दुरूस्ती जवळपास बंदच झाली आहे.

जोडयाला मागून खिळे मारून चक्क ते वरच्या भागाला पायाला रूतत असत तरी तो काळ आपचे आईवडिल केवळ आमच्या शिक्षणासाठी  तसे करीत असत, ही त्या काळाची शोकांतिका आहे.

***********

## चपला जोडे- भाग 9- विनोदी कथा

‘चपला जोडे चौर्यकर्म विश्व विभागाच्या’ नवव्या भागात मी सर्व वाचकांचे  मन:पूर्वक पुन्हा एकदा स्वागत करतो. आपण माझी ही सिरीज अगदी मनापासून वाचत आहात म्हणूनच तर माझा उत्साह अधिक द्विगुणीत झाला आहे.

आज असाच एक नवीन प्रकारचा किस्सा, मी तुम्हास सांगणार आहे. मी गोल्डन बॅज लेखक असल्यामुळे माझे प्रत्येक भाग हे प्रथम कूलूप लाऊन ठेवलेले असतात, त्यामुळे फ्री वाचकांना, त्याचा तूर्त वाचन लाभ घेता येत नाही, या बाबीची मला कल्पना आहे व त्याचे मला किंचीत दु:ख पण आहे. पण असो...माझे सुपर फॅन सबस्क्रीप्शन आपण घेतले नसले तरी जर माझ्या कथा आपणास वाचावयाच्या असल्यास त्या चार दिवसांनी फ्री होतातच. म्हणतात नां की, ‘चार दिवस सासूचे तर चार दिवस सुनेचे’. या ठिकाणी आमची सासू म्हणजे ‘प्रतिलीपी’ व आम्ही लेखक त्यांच्या सुनासारखे कारण आम्ही ‘सुनवत’ जातो त्या आमच्या कथा. व आमची पाठ थोपाटतात ते आमचे फॅन्स.

तर वळू या मुख्य विषयाकडे...मी 1982 च्या दरम्यान तोतलाडोह प्रकल्पावर ‘शाखा अभियंता’ होतो. महाराष्ट्र शासनाची नौकरी म्हटलं की, बदल्या किंवा कोठेही कोणत्याही कामासाठी अवेळी पाठवणे या बाबी ओघाओघाने आल्याच याची तुम्हास कल्पना असेलच. वास्तविक ती शासन ‘बदली’ नसतेच तर तो कर्मचा-यांचा ‘बदला’ असतो. दर पांच वर्षांनी निवडणूका होत असतात. त्या अत्यंत महत्वाच्या कामासाठी शासकीय कर्मचा-यांची निवड केल्या जाते. मला निवडणूकीसाठी ‘मतदान केंद्राध्यक्ष’ म्हणून रामटेक तहसीलीत सावनेर या गावी पाठवण्यात आले. सोबत आमचे पोलींग अधिकारी असतातच. चार ते पांच जणांची टीम माहित नसलेल्या गावात गुप्तपणे नेल्या जाते. ही गुप्तता एवढी असते की, एकदा तर मी अकोला असतांना पांढरकवडा या तहसीलीत एवढया लांब नेवून ठेवले होते की, आम्ही त्या दुर्गम भागात गेल्यावर खेडयातल्या लोकांना लोकेशन विचारले तेंव्हा ते म्हणाले... ‘अहो साहेब, तुम्ही यवतमाळ जिल्ह्याच्या अगदी शेवटच्या टोकावर म्हणजे पुसद तालुक्यात आलेले आहात. असो...

तर रामटेक तालुक्यातील सावनेर या गावात आमची टीम गेली. तुम्हास माहित असेलच की, ज्या दिवशी निवडणूक असते त्या दिवसाचे दोन दिवस आधी आम्हाला त्या गावात बळीच्या बक-यासारखे ओढून नेले जाते. त्यात जबाबदारीचे सामान व बेजबाबदार टीम सोबत असतेच, हा फक्त केंद्राध्यक्षाचा अनुभव असतो. तेथे गेल्यावर अगोदरचा जो रिकामा दिवस असतो तो केवळ केंद्र सजविण्यासाठी असतो. ती शाळा अगदी गावाच्या बाहेर असते. पूर्वी काही सरपंच किंवा पटवारी मंडळी अशा टीमची खातीरदारी करत असतं. पण नंतर जेंव्हा त्यांना

कळले की, यांना याचा अतिरीक्त पैसा मिळतो तेंव्हापासून गावक-यांनी पाहूण्यांना ‘अतिथी देवो भव:’ असे न मानता ‘अतिथी उपाशी मरो’अशा भावनेने ढुंकूनही पाहत नाही. एकदा तर मला व आमच्या टीमला पैसे घेवून सुध्दा लग्न झाल्यानंतर सायंकाळी जो स्वयंपाक उरला होता तो जेवू घातला होता. तर अशी ही शासन कर्मचा-याची दुर्गती.

असे घडू नये म्हणून, मी कर्मचा-यांकडून जेवणाच्या हिशोबाप्रमाणे कॉन्ट्रीब्युशन करीत असे. आता कॉन्ट्रीब्युशनच करायचे आहे तर आमची मंडळी मटन खावू असे ठरवायचे. काही प्रेमी अमृत प्राशनाचीही व्यवस्था करायचे.

संध्याकाळ झाली. जेवणाचा माहौल तयार झाला होता. मी अमृत घेत नसल्यामुळे ईतरांनी त्याचा भरपूर लाभ घेतला व लवकरच निद्रा देवीच्या स्वाधीन झाले. ईतरांनी स्वत:च्या चपला व जोडे यांचा वापर उशीसारखा करून ते डोक्याखाली घेवून झोपले होते. मी मात्र केंद्राध्यक्ष असल्याकारणाने माझ्या साठी त्या गावच्या पाटलाने एक रद्दी व घाण वास असलेली उशी मला पूरवून माझी विशेष व्यवस्था केली होती. ‘आले त्या उशीला घ्यावे डोकयापाशी, तयाची कुरकूर कोण करी’,अशी माझी अवस्था होती.

दुस-या दिवशी सर्वांना पहाटेच उठावे लागते कारण मतदान हे अगदी सकाळी आठ वाजता सुरू करावे लागते. तत्पूर्वी सर्वात महत्वाचे काम म्हणजे ‘सकाळची प्रातर्विधी’. ही व्यवस्था त्या काळी, गावाच्या बाहेरील मैदानाकडे बोट दाखवून केल्या जायची. त्यातही विशेष अशा सूचनांचे पालन करावे लागत असे. गावकरी म्हणायचे..’साहेब, जरा सांभाळून हं...डाव्या हातावर जायचे....उजव्या हातावर महिलांची व्यवस्था राखीव आहे, नाहीतर कराल बावा आमची गोची. सदर सर्व सूचनांना मान देवून मी आता बाहेर निघणारच ईतक्यात पाहतो तर काय माझी फक्त एक चप्पल गायब झालेली मला आढळली. आता आली की नाही पंचायत. अशा वेळी ईमर्जन्सीच्या वेळी आमची टीम तर्क वितर्क करू लागली.

‘ आम्ही कालच तुम्हाला म्हटले होते की, चप्पल डोक्याखाली घ्या..तुम्ही उगीच उशी बोलावली.’

‘अहो , तुमचं म्हणणं अगदी रास्त आहे, पण आता काय?

'साहेब, असं करा, पहाटेची वेळ आहे. दोन्ही पायांना त्रास देण्यापेक्षा एका पायात चप्पल घाला म्हणजे एक पाय तरी सुरक्षित राहील. गावात बाभळीचे काटे फार आहेत.'

मला त्यांचे म्हणणे पटले व खरंच मी एक चप्पल घालून शौचास गेलो. अंधारी पहाट होती कोणाला शंकाही आली नाही व माझे काम झाले. तिकडून येतांना मात्र मी दोन्ही चपला घालून आल्याचे पाहून सर्वांना केवळ आश्चर्यच झाले नाही तर त्यांनी आश्चर्याने तोंडात बोटे घातली. व घडला प्रकार विचारला.

मी बोललो....'त्याचे असे झाले की, मी अंधार असल्यामुळे गावाच्या अगदी जवळच बसायला गेलो, यात माझ हेतू मला काटे रूतू नये एवढाच होता. पण काय आश्चर्य की, तेथे मला माझी चप्पल सापडली होती. पण जरा कुरतडलेल्या अवस्थेत. मागील टाचेचा भाग हा जवळपास ब-यापैकी खाल्लेला होता. आता हे घडले कसे ....तर गावातील शिपाई आला व आम्हा टीमच्या समोर त्याने कबूली दिली की, 'काल मी तुमचा मटनाचा गंज आणत असतांना त्यातील मटन रस्सा थोडा साहेबांच्या चप्पलवर सांडला असल्याचा मला भास झाला होता. त्यामुळेच कदाचीत गावातल्या कुत्र्याने ती चप्पल वेशीवर नेली असावी. हा तर्क वजा अनुभव सर्वमान्य झाला अशा त-हेने ही चप्पला जोडयाची गंमत मला अनुभवावयास मिळाली. चप्पल मिळाली हे माझे भाग्य. सर्वांना या घटनेने झालेले आश्चर्य व आनंद यांचा मेळ, हीच खरी जीवनाची गंमत आहे.

**********

## चपला जोडे- भाग 10-विनोदी कथा

'चपला जोडे चौर्यकर्म विश्व विभागाच्या' दहाव्या भागात मी सर्व वाचकांचे मन:पूर्वक पुन्हा एकदा स्वागत करतो. आपण माझी ही सिरीज अगदी मनापासून वाचत आहात म्हणूनच तर माझा उत्साह अधिक द्विगुणीत होत आहे.

आतापर्यंत चपला जोडे चोरीला जाण्याच्या घटनांचाच आपण विनोदात्मक पध्दतीने आढावा घेतला. हे तर काहीच नाही. याबाबत अशीच एक नवीन प्रकारची घटना मी आज तुम्हास सांगणार आहे. माझा एक मित्र होता सुरेश नावाचा. तो ही माझ्यासारखा अभियंताच होता पण त्याचे वैशिष्ट्य काही वेगळेच होते. एकदा मी सहजच त्याचे घरी गेलो. पाहतो तर काय मला नवलच वाटले. मी विचारले, 'मित्रा, काय करत आहेस.?

‘कां बे, तूला दिसत नाही काय की मी काय करत आहेस. आऽरे, काल माझा जोडा अचानक चालतांना उसवला. खालचे तळवे निघाले. मी दुकानदाराकडे तक्रारीसाठी गेलो होतो पण तो म्हणाला,’याची गॅरंटी संपली आहे म्हणून मी काहीच करू शकत नाही.

‘बरं मग, तू काय केलेस.......काय करणार....शोधली त्याच बाजारात एक जोडे शिवायची सुई. आरे काही केल्या मिळत नव्हती ही सुई पण मी अतिशय चिकट प्रवृत्तीचा असल्याने शेवटी शोधलीच बावा एका दुकानात. आणली घरी आणि आता मी माझा जोडा शिवत आहे. त्यात काय अशी मोठी गोष्ट आहे.

‘आरे पण, सरळ चौकात गेला असता आणि केवळ दहा रूपयात शिवून आणला असता जोडा. कशाला एवढा सुई शोधण्याच्या भानगडीत पडला.’ व आता जोडा शिवत आहेस. खरंच तुला ती कला जमेल काय?

‘मग कां जमणार नाही, मी ईंजिनियर आहे. मला कां जमू नये अशा साध्या गोष्टी.’

‘ते ठिक आहे रे पण आपल्या जीवनाचा अमूल्य वेळ अशा फालतू कामात कां घालवायचा’.

‘याला तू फालतू काम म्हणतोस. ही सुध्दा एक चौसष्ट कलेतील एक कला असू शकते की नाही.’

मी क्षणभर चूप बसलो व त्याची ही ‘जोडा शिवण्याची अफलातून अशी कला’ पाहात बसलो.

‘यानंतर तुला पण असा काही प्रॉब्लेम आला तर मला सांग कारण मी आता हळूहळू या ‘चपला जोडे शिवण्याच्या कलेत’ निपूण होत आहे. असो हा प्रकार त्याचा संपला.

दुसरा दिवस उजाडला. तो माझे घरी आला व म्हणाला,’ प्रकाश, चलतो कां सिनेमा बघायला’..... त्यावेळी मी अकोला येथे राहात होतो. आमच्या गौरक्षण रोडवर असलेल्या घरापासून नव्यानेच तयार झालेली एक सिनेमा टॉकीज जिचे नांव आहे ‘राधाकृष्ण’. तेथे आपण पायीच जावू असे ठरले. ही टॉकीज जवळ होती व आम्ही दोघेही पायीच जायचे असल्याने एक शॉर्ट कट शोधला. तो होता त्या टॉकीजच्या मागून. पावसाळयाचे दिवस होते. पावसाचे पाणी साधारणच झाले होत. पण टॉकीजच्या मागून येणा-या भागात, तो भाग खोलगट असल्याने पाण्याने भरला होता. पाण्यातूनच टॉकीज गाठावी असे दोघांनीही , पाण्याची खोली

कमी आहे असे गृहीत धरून निर्णय घेतला. सिनेमा सुरू होण्याची वेळ झाली होती. शिवाय तिकीट पण काढायची होती. हे सर्व पाहता आम्ही दोघे घुसलो त्या पाण्यात. मध्ये गेल्यानंतर लक्षात आले की, पाण्याची खोली अपेक्षेपेक्षा जरा जास्तच आहे. मग काय ....मागे जाणे ईष्ट नव्हते व पुढे जाणे घाईमुळे भागच पडले होते. दोघांच्याही पायात बूट होते. त्याचा बूट कालच स्वयंशिवीत असल्याने तो नेमका त्या पाण्यातच थोडासा उसवला. त्यात खालून व वरून असे दोन्ही भागातून पाणी पूरेपूर शिरले होते. तशातही काहीसा भाग हा चिखलाचाही आढळला. मग काय... चिखलयुक्त पाणी आमच्या दोघांच्याही जोडयात घुसले. जेंव्हा खोलगट गड्डयाचे  बाहेर निघालो तेथे जोडे धुण्याची सोय कोठेच जवळपास नव्हती. आम्ही तशाच अवस्थेत टॉकीजमध्ये गेलो. ओल्या पायातील घाणेरडया पाण्याचा वास टॉकीजमध्ये बसलेल्या खूर्चीच्या आजूबाजूला पसरला. त्यात मोज्यांच्या वासाचाही भरणा होताच.

आजूबाजूच्या लोकांची वास सहन करण्याची ‘सहनशक्ति ‘जवळपास संपुष्टात आली होती. त्यातही जवळ बसलेला माणूस हा जरा दादागिरी करणा-यापैकी होता असे आम्हा दोघांनाही वाटले. तो सारखा वास कोठून येत आहे याचा शोध घेत होता. तो आमच्याकडेही अधून मधून संशयीत वृत्तीने पाहात होताच. माझा मित्र सुरेश म्हणाला,’आता जर आपण येथून उठून गेलो नाही तर हा आपल्याला सोडणार नाही.

आम्ही मार खाण्याचे टाळण्याचे हेतूने तेथून हळूच खसकलो. अशा रितीने आम्हाला तो सिनेमा तर भाग्यात नव्हताच पण आमचे जोडे जे खराब झाले ते ईतके खराब झाले होते की, शेवटी ते आम्हा दोघांनाही अक्षरश: फेकून दयावे लागले.

घरी आल्यावर मी त्याला बोललो....’काय रे सुरेश, कशाला घरी जोडे शिवण्याचा उपक्रम केला. चांगला चर्मकाराकडून शिवला असता तर काय बिघडले असते.’ तो ऐकयाचे मनस्थितीत नव्हता उलट मला म्हणाला....’ उदया बघच तू....बाजारातून दोन रबरी तळवे आणि वर जोडयाचे चामडी सुटे सामान आणतो आणि एक माझ्यासाठी व तुझ्या साठी एक नवीन जोडा शिवून दाखवतो. तोही अगदी नव्यासारखा. असा हा अफलातून मित्र आजही ब-याच गोष्टी शक्यतोवर आपल्या घरीच तयार करतो. मग तो घरी लागणारा भाजीपाला कां असेना..याला म्हणतात...

“जीवन ऐसे नाव, जो चाहे वो घरमेंही बनाव.”

***********************************

## चपला जोडे भाग 11- विनादी कथा..

मागील भागात आपण चपला जोडे चोरी जाण्यापासून तर चपला किंवा जोडे घरीच कसे शिवावे व ती कला आत्मसात कशी करावी हे पाहले. आता या भागात चपला जोडे घालण्याच्या पध्दतीवर  काही चर्चा मी करणार आहे.

आपण सामान्य माणसात येतो असे गृहीत धरू. आपल्याजवळ फार तर एक दोन किंवा तीन जोड ठेवू शकेल एवढीच काय ती आपली पात्रता. नाहीतर तुम्ही सेलिब्रिटींचा विचार केला तर त्यांचे जवळ म्हणे एक आलमारी भरून चपला जोडे असतात. त्यांना चपला जोडयातही मॅचींग पाहिजे. नशीब त्यांना अन्नधान्य मॅचींग लागत नाही. आपल्याला पैसा कसा  वाचवावा हा प्रश्न पडतो व त्यांना पैशाचे काय करावे हा प्रश्न पडतो.

तर आज मी सामान्याविषयी बोलणार आहे. माझा एक मित्र आहे तो कार चालवतांनाही चपला बाहेर काढून कार चालवितो. चप्पल झीजेल या हेतून नाही तर त्याला तशी संवय आहे. मी लेखक असल्यामुळे सहजच ‘चांभार चोकशी’ केली. ‘चांभार चौकशी’ चा चांभाराशी फारसा संबंध येत नाही पण माझा चौकशीचा विषय हा चर्मज्ञ असल्यामुळे मी त्यास विचारले की, ‘कां रे बाबा, तू कां कार विनाचपलाने चालवतो?’ तर तो उत्तरला की,..’ मी जर चप्पल घालून कार चालवली तर मला भास होतो की, माझ्या पायाचा स्पर्श ॲक्सीलरेटरला झालाच नाही. मग मी ते ॲक्सीलरेटर कसे व किती दाबावे याचे मला आकलन होत नाही. शिवाय ती पौचाकडेच झीजेल अशीही माझी काहीशी भावना आहे. त्याच्या भावनेत मी अंशत: सहभागी होत आहे.

मी बरेचदा असे निरीक्षण केले आहे की, पुष्कळ लोकांच्या चपला व जोडे हे मागील भागाच्या टाचेवर एका साईडने झीजतात मग त्यांना ती चप्पल किंवा बूट फेकून दयावा लागतो. हा पाय मागून तिरपाच कां पडत असावा याचे मी संशोधन करायचे ठरविले. लोकं चालतांना विनाकारणच एका बाजूला झुकून चालतात. विशेषत: लेडीजच्या टाचा अतिशय म्हणजे आवश्यकते पेक्षा उंच असल्याने त्या एका बाजूने झीजत असाव्या असा मला शोध लागला.

माझी बायको आज जाम भडकली. मी आज सहजच तीला सकाळी विचारले की, ‘काय करीत आहेस?’ तर मी म्हणाली,’ तुम्हाला काय एवढेही माहित नाही की, आज ‘वटसावित्री’ आहे मी पूजा करणार आहे म्हणून एवढया सकाळी उठली. तुम्हाला काय त्याचं, तुम्हाला आयता चहा मिळतो आणि मग बसता फालतू विषयावर लिहित संगणकावर’…. हे एकूण मी चाटच झालो. चपला जोडे हा विषय जर फालतू असता तर आता तुम्हीच सांगा मी याचे दहा भाग लिहू शकलो असतो कां?

ती म्हणाली…’तुम्हाला फालतू विषयावर लिहायची संवयच आहे. नाहीतरी तुम्ही करणार काय …रिटायर्ड झाल्यावर लोकं कसे फिरायला जातात, हेल्थ मेंटेन्ड करतात वगैरे वगैरे…

अगदी वटसावित्रीच्या दिवशी मला ही ‘वटवट’ ऐकावी लागण्याचे खरे कारण मला कळले व मी आज ही सिरीज संपवूनच टाकतो असे मनोमन ठरविले. पण झालं काय की, आज मी सहजच माझी प्रतिलीपीवरची वाचक संख्या पाहली तर मला आढळले की, ती 44,719 झाली आहे. चपला जोडे या माझ्या लिहित असलेल्या दहा भागापैकी सात भाग हे लॉक असतांना सुध्दा या सिरीजची वाचक संख्या शंभरी गाठत आहे. तीन भागाचे वाचक शंभर तर अकरा भागाचे तीनशे तरी होतीलच असे समजून आज मी अकरावा भाग लिहायला घेतला.

तर आपण चप्पल घालण्याच्या पध्दतीबाबत बोलत होतो. तशी ती कोणी कशी घालावी हा काही मार्गदर्शक तत्वाचा भाग होवू शकत नाही याची मला जाणीव आहे. पण सामान्य माणसाच्या जीवनाकडे पाहले तर मग मात्र हे सुध्दा महत्वाचे आहे असे उगीचच वाटते. असो..

चप्पल घालणारे, हे जोडे घालणा-या माणसांपेक्षा कमी आळशी असतात असाही एक नवीन शोध मी लावला कारण चप्पल घालणारे बिचारे मुकाटयाने चप्पल बाहेर काढतात. याउलट जोडे वापरणारे हे आंत पायात दुर्गंधयुक्त मोजे असल्यामुळे ते लोकं जोडे काढायसाठी आळस करतात. ते तसेच जोडे घालून बिनधास्त, आपल्याकडे कोणाचेच लक्ष नाही असे गृहीत धरून सरळ घरात प्रवेश करतात. त्यांना काही म्हणावे तर राग येवू शकतो आणि नाही म्हणावे तर आपले घर खराब होवू शकते. अशा द्विधा मन:स्थितीत घरमालक ही बाब मुकाटयाने सहन करीत असतो. हे तर काहीच नाही माझा एक नातेवाईक स्पोर्ट्स टीचर होता. त्याला पायातला जोडा काढण्याचा अतिशय कंटाळा येत असे. तो केवळ बैठक रूमपर्यंतच नाही तर चक्क किचन रूमपर्यंत ,वहिनी काय चाललं, म्हणायला जायचा…मग काय याचा पूर्ण दोष माझाच

आहे असे समजून माझी बायको मला, तो गेल्यावर झापत असे. ‘वडयाचं तेल वांग्यावर’ ही म्हण मला आता आता समजायला लागली.

**************************

## **2.**चार आण्याची उधारी... विनोदी बालसाहित्य कथा

जसं टाळया म्हटल्याशिवाय लोकं टाळया वाजवत नाही तसंच विनोदी कथा म्हटल्याशिवाय लोकं वाचत नाही म्हणून वर विनोदी कथा असं लिहिलं आहे. सिरीयस लोकांनी ते मनावर घेवू नये .

मी लहानपणी बाबांना खूप कथा सांगायला लावायचो. वडीलांचा कथेचा स्टॉक संपला की, ते मग प्राथमिक शाळेचे मुख्याध्यापक असल्यामुळे मला स्वत: काहीतरी कल्पना करून गोष्ट सांगायचे. त्यातलीच एक कथा आज मला आठवली ती जशीच्या तशी प्रस्तुत करतो. कदाचीत या कथेला तुम्ही बालकथा समजून वाचली तरी चालेल.

एका गावात एक अतिशय कंजूष माणूस होता. तो बाजारात गेला आणि एक रूपयाचा त्याने सौदा घ्यायचे ठरविले. जुन्या काळात एक रूपयामध्ये ब-याच वस्तू येत होत्या. तर झाले असे की, या कंजूष माणसाजवळ तीन चारआणे म्हणजे आजचे 3x25=75 पैसे होते. सोळा आण्याचा एक रूपया म्हणजे थोडक्यात चार आण्याचं म्हणजे 25 पैशाचं नाणं कमी होतं. आजकाल चार आणे बंद झाले आहे. दुकानदाराला याने अगदी प्रांजळपणे सांगितले की.... "माझ्याजवळ चार आणे कमी आहेत." दुकानदार बोलला की, काही हरकत नाही चार आणे तुमच्याकडे उधार राहू दया. पुढच्या महिण्यात उधारी देवून दयाल.

तो गावला आला व त्या कंजूष माणसाने पक्के ठरविले की काहीही झाले तरी दुकानदाराचे चार आणे दयायचे नाही. दुकानदाराने बरेच दिवस वाट पाहली पण पैसे मिळण्याचा अंदाज त्यास दिसला नाही. मग दुकानदार स्वत:च त्या गावात गेला व त्याला उधारी मागू लागला. एक दोन महिणे विविध कारणे सांगून कंजूष माणूस वेळ टाळून न्यायचा.

दुकानदारही फारच चिकट आणि चिवट होता. दुकानदाराने ही ठरविले की काहीही झाले तरी हे चार आणे बुडू दयायचे नाही. दोघांचीही भूमिका टोकाची होत गेली.

मग एक दिवस तो कंजूष माणूस गावातल्या लोकांला म्हणाला की,.... आऽरे यार ..हा भलताच चिवट दुकानदार दिसतो. तो आजही आल्याशिवाय राहाणार नाही. तेंव्हा एक काम करा, मी आज मेल्याचे सोंग घेतो. तुम्ही बाहेर पांढरा कपडा टाकून तिरडी तयार करून ठेवा. गावातले लोकं जरा सहकार्य प्रवृत्तीचे असल्याने त्याला मदत करण्यास तयार असतात. बस अगदी वेळेवर ठिक नेहमीप्रमाणे दुपारी बारा वाजता दुकानदार गावात येतो. पाहतो तर काय सर्व लोकं खूप रडत असतात. दुकानदार म्हणतो....."काय झाले आहे." सर्व गावकरी मंडळी म्हणतात.... अहो ऽऽऽ आजच तो मनुष्य ज्याचेकडे तुमची चार आणे उधारी होती तो मेला आहे.

दुकानदारालाही क्षणभर वाईटच वाटते. तो विचार करतो आता काय करावं. आपले चार आणे बुडणार म्हणून तो म्हणतो. ठीक आहे काही हरकत नाही पण आता तो मेलाच आहे तर माझी अशी ईच्छा आहे की त्याची अंत्यक्रिया करूनच जावे. आता लोकांना खूप मोठा प्रश्न पडतो की, आता काय करावे तो तर जीवंत आहे. गावातील मंडळी आत जावून त्या कंजुष माणसाला म्हणतात की, आता कसं काय करायचं. कंजूष माणूस म्हणतो की काही काळजी करू नका. तुम्ही मला तिरडीवर ठेवा पुढे पाहू काय होईल ते. सर्व मंडळी बाहेर येवून दुकानदाराला म्हणतात की, आता आम्ही याची पुढील अंत्यविधी पार पाडतो तुम्ही कशाला उगीच थांबता ? तेंव्हा दुकानदार म्हणतो....नाही नाही मीच याला अग्नी देणार आहे. आता गावक-यांना फारच पंचायत पडते. तिरडीवर असलेला हा माणूस अगदी जीवंत असतांनाही तो अंत्य यात्रेला तयार झालेला असतो. प्रेत यात्रा निघते. स्मशान घाटात गेल्यावर काडयांचा ढीग रचण्यात येतो व त्यावर हया कंजूष माणसाला झोपवतात. आता अग्नी लावण्याची वेळ येते. दुकानदाराच्या हातात अग्नीचा टेंभा असतो व तो आता त्या कंजूष माणसास अग्नी लावणार ईतक्यात गावातला एक बुजरूग म्हातारा जोरात ओरडतो की .....थांबा थांबा....त्याला जाळू नका. दुकानदार आश्चर्याने त्या म्हाता-याकडे पाहतो व म्हणतो... "कां बरं कां जाळायचं नाही." तेंव्हा तो उत्तर देतो की ......."अहो चार आण्या पैशासाठी त्याला कशाला जाळता हो....आहो मी अगदी लहानपणापासून त्याला ओळखतो की, तो ईतका कंजूष आहे की तो पूर्ण जळून जाईन पण तुमचे चार आण्याची उधारी मात्र कधीच देणार नाही." दुकानदार म्हणतो...

"जळून जाईन म्हणजे ... तो मेला आहे नां." . नाही हो, तो जीवंत आहे. त्याला चार आणे तुमचे दयायचे नव्हते म्हणून त्यांनी आम्हाला असे सोंग रचविण्यास सांगितले आहे.

आता तर दुकानदाराला एवढा संताप आलेला असतो की तो खरंच त्याला जाळायला लागतो पण सर्व गावक-यांनी सहकार्याने त्या कंजूष माणसाची सुटका केली व सहकार्याने त्या दुकानदाराची चार आण्याची उधारी फिटवली.

कथा खूप जुनी असली तरी बाबांच्या आठवणी मला माझ्या लिखाणाला ताजेपणा आणतात. म्हणूनच हा प्रपंच.

धन्यवाद!

3.हसण्याची कला....... लेख स्व विकास

**"Learn to laugh. Seriousness is a sin, and it is a disease. Laughter has tremendous beauty. It will bring lightness to you, and it will give you wings to fly."- Osho**

हास्य, हे एक मनाला आनंद झाल्याचं प्रत्यक्ष दर्शनी दिसणारे चेह-यावरचे भाव (gesture) होय पण हास्याचे खूप प्रकार पडतात. कधी कधी हास्य हे उपहासात्मक असल्याचे पण निदर्शनास येते त्यावेळी समोरच्या माणसाला दु:ख होते. साधारणपणे सर्वांनी हसत जीवन घालविले पाहिजे.

स्त्रियांचे स्मित किंवा हास्य यामुळे त्यांच्या सौंदर्यात वृध्दी होते. Face is the index of mind. असे मोहम्मद नजामुद्दीन यांनी म्हटले आहे तसेच Face is the mirror of mind असे सेंट जेरोम यांनी म्हटलेले आहे.

एकंदरीत माणसाच्या चेह-यावरून त्यांचे हावभाव वाचता येतात, हा निष्कर्ष निघतो. प्रत्येकाच्या चेह-याची ठेवण ही निराळी असते पण काही हिंदी विनोदी कवी असे आहेत की, ते

स्वत: कधीच  हासत नाही पण ईतरांना मात्र खळखळून हसवतात. दोन मित्र एकत्र आले की हास्यकल्लोळ निर्माण होतो. हास्यातून भावनेची देवाण घेवाण होते.

माणूस जर हस-या चेह-याचा नसला, तर तो अहंकारी असावा असे लोकांना वाटते. म्हणूनच जर आपण शंभर लोकांकडे पाहून अवलोकन केले तर काही चेहरे त्यांची ओळख नसतांनाही नकोसे वाटतात पण काही मात्र ओळख नसतांना ही हवेसे वाटतात.

एक सहज उदाहरण म्हणून सांगतो. एकदा मी बसने प्रवास करीत होतो. बसमध्ये गर्दी असल्याने मी उभ्या रांगेत होतो. गंमत म्हणून सांगायचे झाल्यास Standing मध्ये उभा होतो. ही पध्दत आहे सांगण्याची. यात "स्टँडींग" हे नाम व "उभा" हे क्रियापद गृहीत धरावे म्हणजे वाक्यात चूक नाही हे कळेल.

तर एका दोनच्या सीटवर एकटीच महिला बसली होती व तिच्या बाजूची जागा खाली होती. माझ्या समोर उभ्या असलेल्या माणसाने बसण्यासाठी पृच्छा केली तेंव्हा तीने बस सुटायची असल्याने, "एक जण येणार आहे" असे म्हटले. मला प्रवासाचा भरपूर अनुभव असल्याने मी हे ताडले की, ही महिला, तिच्याजवळ कोणी बसू नये म्हणून अशी म्हणत असावी. तरी त्याने पुन्हा एकदा म्हटले की ....."तुमची व्यक्ति आली की मी उठेन". हे पाहून तिने त्याचेकडे क्रूर नजरेने पाहले. मी त्या व्यक्तिच्या मागे उभा होतो म्हणून मी गालातल्या गालात हसलो.

थोडया वेळाने बस सुरू झाली पण त्या जागेवर कोणीच आले नाही. आणि माझा अंदाज खरा ठरला. पण माझ्या त्या स्मित हास्यामुळे, मला तिने मागे वळून सीटवर येण्याचा ईशारा केला. अशा रीतीने मला सीट तर मिळाली पण तिच्या क्रूरचेह-यामुळे "स्वत:ची काळजी घेतली पाहिजे" असे मनात वाटले.

ही घटना जरी लहानशी असली तरी यातून मी एक बोध घेतला की, प्रवासातही लाख चिंता मनात असल्या तरी, थोडे तरी हास्य चेह-यावर पाहिजे. दोन तासाचा प्रवास सुखाने पार पडतो.

मी एक तुम्हास सुचवू ईच्छितो की, बाहेर केंव्हाही तुम्ही गेलेत तर स्वत:चे मन नेहमी प्रसन्न ठेवा कारण बहुतांश लोकं (ऐंशी टक्के) ही त्रस्त झालेली असतात. विशेषत: कंडक्टर,

खिडकीवरचे बँक एम्प्लॉईज, बसस्टँडवरचा चौकशीवाला, ईत्यादी. यांच्याशी बोलायचे असल्यास प्रथम त्यांना नमस्कार करा मग पहा तुमचे काम कसे लवकर होते ते. जे अगोदरच त्रस्त आहेत त्यांची टिका रांगेत उभे राहून करू नका कारण ते त्यांना ऐकू जात असते. माझी कोणाशीच ओळख नसते तरी सुध्दा मी जर रांगेत तिस-या नंबरवर असलो तर मी बँकेच्या कर्मचा-याला नमस्कार करतो व तो मला अगोदर बोलावतो व म्हणतो....."द्या साहेब, तुमचं काय आहे ते..." मग समोरच्याला उगीचच वाटते की मी त्यांच्या ओळखीचा आहो. पण यामुळे मी कालांतराने त्या व्यक्तिचा खरंच ओळखीचा होतो. याला मुख्य कारण तो कर्मचारी नमस्कार करणा-या माणसाला निरखून पहात असतो त्यामुळे मी त्याच्या लक्षात राहतो. असे माझ्या अनुभवांचे प्रयोग, आपणही कधीतरी करून पाहा.

तर मित्रांनो, हास्य कला साध्य करा व जीवनात आनंदी राहा.

"Be happy forever and enjoy your life.

..........................................................................

## 4.संशयी बायका- वैचारिक स्त्रीरहस्यलेख- काल्पनिक

“स्त्रीश्चरीत्रम् देवो न जाणति”.- संस्कृत वाक्य

वर लिहिलेले मी कोठेतरी वाचले आहे. याचा अर्थ असा की, हे देवालाही कळले नाही की, स्त्रीचे ‘चरीत्र किंवा चारीत्र्य’ नेमके कसे आहे. सर्वसाधारणपणे प्रत्येकाने हा अनुभव जीवनात घेतलाच असेल की, स्त्रीया हया ‘संशयी वृत्ती’च्या असतात.अर्थात याला काही सुशिक्षीत महिला अपवादही असू शकतात हे मी मान्य करतो पण केवळ मनोरंजनाचे हेतूने आज काहीतरी लिहितो आहे.

आकाश घराबाहेर पडला की, तो नेमके कोणत्या कामासाठी जातो हे तो घरी आवर्जून सांगत असतो कारण तो एक प्रामाणिक माणूस असतो. असे सर्वच जण करतात असे नाही. काहीजण तर म्हणतात की, ‘सर्व सत्य सांगणे’ हे स्वातंत्र्याच्या दृष्टीने योग्य नसते. पण असो तो ज्याचा त्याचा प्रश्न आहे.

तर आकाशच काय पण कोणताही माणूस घराबाहेर पडला की, लगेच त्याची बायको त्याला फोन करीत असते व उगीच काहीतरी आणायला सांगण्याचे निमित्ताने, 'नवरा नेमका कोठे आहे', हे पडताळतात. आता प्रश्न उरतो तो हा की, बायका संशयी कां असतात.

सर्वप्रथम आपण हे गृहीत धरू की, जगातील सर्व स्त्रिया हया चांगल्या आहेत. याबाबत मी एक विवेकानंदांचे वाक्यही कोठेतरी वाचले आहे की, 'जगात जर सर्व स्त्रिया चांगल्या असत्या तर जगातला एकही पुरूष वाईट झाला नसता'. असो. आता आपण एक प्रयोग करू की, प्रत्येक बाईला विचारू की, तुम्ही कशा आहात तर ते तुम्हाला काय उत्तर देतील की, त्या फारच चांगल्या आहेत. म्हणजे हे सिध्द झाले की, जगातील सर्व बाया हया चांगल्याच आहेत मग सर्व प्रकारच्या बायकांच्या  मनात प्रथम ही शंका कां येते की आपला नवरा नेमका कोठे असेल. व त्यांना ईतर बायकांचा हेवा कां वाटतो. हा मला पडलेला प्रश्न आहे, त्याचे उत्तर बायकांनी दयावे. की केवळ नव-यावर काहीतरी शंका घेत राहले म्हणजे त्यावर अंकूश राहील.

काही बायका म्हणतात की, आम्ही अजिबातच नव-यावर शंका घेत नाही. मग अशा नव-यांना मी विचारले की, तुम्ही फार आनंदी जीवन जगता राव....तर ते म्हणतात की, आम्ही तशी संवय त्यांना खोटे बोलून लावली. तर मग मला हा प्रश्न पडतो की, बायकांशी नेहमी खोटेच बोलत राहायचे काय. हे तर असे झाले की, 'ईकडे आड आणि तिकडे विहिर'. म्हणजे जीवनात पाहिजे तसा आनंद घेता येईल. आता तर जीवन संपुष्टात आले आहे. उरले ते बोनस जीवन.

कालपरवा एक व्हाट्सअॅपवर, सुधा मूर्ती यांचे संभाषण असलेला व्हीडिओ पाहला. त्याचा आशय असा की, स्त्रियांनी आपल्या नव-याला तो जसा आहे तसे स्विकारावे व त्यास काहीतरी स्पेस दयावी व स्वत:ही आनंदी राहावे. तो वयाचे सव्वीस वर्ष त्याचे आईजवळ राहला आहे व त्यानंतर तो आपला पती झाला आहे तेंव्हा त्याचेवर हक्क त्याचे आईचा जास्त आहे. Any way....

मी एक अशी घटना काही वर्षांपूर्वी वाचली ती अशी...एका विदयार्थ्याने खूप अभ्यास करून तो आय ए एस झाला व अशाप्रकारे तो कलेक्टर झाला. त्यानंतर त्याचे लग्न झाले. मात्र त्याची बायको व त्याच्या आईचे नेहमी घरात भांडण व्हायचे. असे लक्षात येताच ही बाब ईतकी टोकास गेली की, शेवटी त्याने केवळ सहा वर्ष सर्व्हिस करून आत्महत्येचा निर्णय घेतला.

या सर्व अंसंबंध लेखात मला एवढेच सांगायचे होते की, 'प्रत्येकाला जगण्याचे स्वातंत्र्य मिळू दयावे'. असे जर होत नसेल तर यापुढे विवाहसंस्था बंद होतील व माणसे एकटेच जीवन जगण्याचे ठरवेल.

या सर्व बाबींचा विचार व्हावा व या लेखाद्वारे कोण्या स्त्रियांच्या भावनांना ठेच पोहोचली असेल तर त्यांनी मला सहृदयतेने माफ करावे कारण अशा उचापती लेखक नवरे करीत असतातच. ते केवळ आपल्या मनोरंजनासाठी.

..............................................................................

5.व्यक्ति आणि प्रवृत्ती.......व्यक्ति चित्रण विनोदी कथा

या जगात निर्माण होणारी प्रत्येक व्यक्ति ही वैशिष्ट्यपूर्ण असते, असे नेहमीच आढळून येते. आता मी आपणास एक एक उदाहरण देतो.

1. आम्हाला डिझाईन ऑफीसमध्ये एक बंगाली कार्यकारी अभियंता होते. त्यांचे नांव दासगुप्ता असे होते. त्यांचे वैशिष्ठय असे होते की, ते बंगाली असूनही मराठी चांगले बोलत असत. ते शिक्षणामध्ये चांगले एम.ई. (Master of Engineering) होते. पण त्यांना ईंजिनियरींगपेक्षा वाचनात व संगीतात फार गोडी होती. ती गोडी एवढी भयानक होती की, त्यांनी त्यांच्या शासकीय पाटीवर सुध्दा कार्यकारी अभियंता M.E.(civil) असे न लिहिता ते "संगीत विशारद" असे लिहित असत. कोणत्याही कारणाने आम्हाला जळगांवला जाण्याचे काम पडत असे तेंव्हा ते मंडळ कार्यालयातील अभियांत्रीकी कामाला विशेष महत्व न देता प्रथम जवळच असलेल्या आकाशवाणी केंद्रात जावून त्यांचे एक गाणे रेकॉर्ड करून यायचे. तसेच वाचनाची आवड एवढी की, माझ्याप्रमाणेच रस्त्यावरची स्वस्त पुस्तके ते उचलून किंवा कमी किंमतीमध्ये आणायचे आणि शासनाच्या आलमारीत कोंबायचे. पुस्तकांची संख्या एवढी जास्त होत होती की, त्यांनाही कधी कधी कोणते पुस्तक कोठे ठेवले आहेत हे माहित नसायचे. त्यांच्या संग्रहात अश्लील मासिके, विविध वाचनालयातून दाबलेली पुस्तके, हिंदी कादंब-या ईत्यादी असायचे. एक दिवस त्यांची ट्रान्सफर चंद्रपूरला झाली. तेथे त्यांचे निधनही झाले. मग काय

कार्यालयातील मंडळी आपापल्या रूचीनुसार तो पुस्तकांचा माल "हपापाचा माल गपापा" या तत्वानुसार आम्ही एक एक पुस्तक दाबायला लागलो.

सर्व इंजिनियर हे चुकून इंजिनियर होतात असे आढळते. पण प्रत्यक्षात त्यांचे गुणधर्म हे वेगळेच असतात. मी सुध्दा इंजिनियर असून वयाच्या 43 व्या वर्षात बी.ए. (मानसशात्र व ईंग्रजी साहित्यात) Open university Nasik येथून केले कारण मला लेखनाची आवड असल्याने मी मराठी टायपिंग सुध्दा घरीच कॉम्प्युटरवर शिकलो.

2. माझा एक मित्र आहे. त्यालाही प्रसिध्दीची खूप आवड आहे पण त्याचे कडे पाहिजे तसे लिखाणाचे स्कील नाही. मग काय तो तीन वर्षापासून काही पेपरची कात्रणे जमा करून ठेवतो व आता लोकल पेपरमध्ये तेच लेख हूबेहूब हाताने लिहून स्वत:च्या फोटोसहीत प्रसिध्द करतो.

3. तोतलाडोह क्षेत्रावर एक "नायर" नावाची व्यक्ति होती. तो प्रायव्हेट कंत्राटदाराकडे इंजिनियर होता. मला त्याचे काम तपासायचे होते पण तो काय करायचा की एक तर त्याने मला मलयालम भाषा शिकवून दिली होती. दुसरे असे की माझे लक्ष शासकीय कामावरून डायव्हर्ट व्हावे या उद्देशाने अशी काही बातमी वाचायचा व मला सांगायचा की, आपल्याला त्याचेशी काही घेणे देणे नसते. त्या बातमीची साईटवर उगीच चर्चा करायचा. उदा. सर तुम्हाला माहित आहे काय? आज कॉन्स्टँटीन चेर्ननकोव्ह(Konstantin Chernenko-) हे भारताशी चर्चा करणार आहे. मी म्हणायचो आता हे कोण?

-आपको पता नही....This is Konstantin Ustinovich Chernenko is a Soviet politician and the fifth General Secretary of the Communist Party of the Soviet Union. ही 1982 ची घटना आहे कारण ही महान व्यक्ति सध्या हयात नाही. आता मला सांगा या चेरनेनकोव्हशी मला काय काम आहे बरं. अशा काही व्यक्ति अफलातून असतात.

स्वत:चे काहीतरी वेगळे व्यक्तिमत्व दर्शविणा-या अशा वैशिष्ठयपूर्ण व्यक्ति या जगात वावरत असतात. आता माझेच उदाहरण घेतो. स्वत:बद्दल सांगितल्याशिवाय विनोद निर्मिती होत नसते. मी नेहमी ईंग्रजी पेपर व ईंगजी साहित्य जास्त वाचतो याचा अर्थ मी खूप हूशार आहे असे समजू नका तर ती माझी मजबूरी आहे.

एकदा मी "मराठी लोकमत"(मुद्दाम मराठी म्हटले आहे, वास्तविक त्या काळात लोकमत हिंदी व ईंग्रजीत नव्हता तरी) बसमध्ये प्रवास करतांना वाचण्याकरीता घेतला त्यातील एक एक पान सगळया बसमध्ये वाचायला फिरला. जेंव्हा पेपर बसमधून पूर्ण भ्रमंती करून माझ्या समारील सीटवरून मागे मी मागीतला तेंव्हा समोरची व्यक्ति मला रितसर म्हणाली की, तुम्हाला साधा पेपरही विकत घेता येत नाही काय. तरी तो त्याचा पेपर नव्हता. तेंव्हा मी मनात म्हटले बोंबला आता, तेंव्हा पासून मी ईंगजी वृत्तपत्र वाचतो. तसेच पुस्तकांचे ही आहे. माझ्या घरी मराठी पुस्तक रॅकमध्ये कोणालाही दिसले की, येणारी व्यक्ति वाचायला नेवू कां म्हणते आणि ते पुस्तक कायमस्वरूपी त्याचेचकडे ठेवून घेते म्हणून मी ईग्रजी पुस्तके वाचतो. आता कोणीही आले की, ईंग्रजी आहे काय ? मग राहू दया असे म्हणतो.

तरी एक प्रसंग ओढवलाच. माझा मित्र पप्पूसेठ भोजवानी याने एकदा मला माझी आवड पाहून "मॅरीओ पुझोची गॉडफादर" ही ईंग्रजी कादंबरी वाचावयास दिली होती. माझ्याकडची ती कादंबरी एका दुस-या मित्राने वाचायला नेली पण तो वापस करण्याच्या मुडमध्ये नव्हता. माझे पुस्तक असते तर मी कदाचीत त्यास मागितलेही नसते, पण हे दुस-याचे असल्याने मला वारंवार मागावे लागले. शेवटी तो दुसरा मित्र कंटाळून मला म्हटला....."आरे यार कां वारंवार मागतो ते पुस्तक. ते मी माझ्या शो केसमध्ये ठेवले आहे. आणि मीआता ते तुझ्याकडून चोरले आहे असे समज." मला ही चारशे रूपयाची कादंबरी मित्राला विकत घेवून वापस करावी लागली. आहे की नाही असे नमुने जगात. यालाच म्हणतात..."व्यक्ति तितक्या प्रकृती." किंवा प्रवृत्ती.

********************

## 6.वेदनालय- विनोदी अनुभव कथा

### “Endure the pain, Enjoy the gain.”- Quotes for the mind.com

‘दवाखाना’ हा शब्द कदाचित  दवा जेथे खायला मिळते तो दवाखाना असा रूढ झाला असल्याची शक्यता नाकारता येत नाही. पण मी या दवाखान्याला एक वेगळेच नांव देवू ईच्छीतो. ते म्हणजे ‘वेदनालय’ कारण त्या ठिकाणी वेदना घालविण्यासाठी प्रथम वेदनेलाच

सामोरे जावे लागते, हा सर्व सामान्यांचा अनुभव आहे. तसाच काहीसा मलाही अनुभव माझे जीवनात आला आहे पण तो फारच कमी वेळा. आता कमी वेळा अनुभव त्यांनाच येतो, जे कमी वेळा आजारी पडतात किंवा वेदनेने ग्रासलेले असतात. स्वत:चं दु:ख हे ब-याचदा दुस-यासाठी क्षणभ-याचा कां होईना पण एक प्रकारचा आसूरी आनंद देवून जातो. असे असावे म्हणूनच तर कोणतीही बायको ही नव-याला लवकर दवाखाण्यात नेत असावी असा माझा कयास आहे. पण तुमची बायको ही तुम्हाला काळजीपोटी नेत असेल तर तुम्ही भाग्यवानच म्हणायला हवे. असाच एक प्रसंग नाशिक येथे असतांना मी अनुभवला. वरचे अधोरेखांकीत वाक्य मी यासाठी म्हटले की, एखादा माणूस मरण पावला व तो स्मशानामध्ये जळत असला की, लोकं तेथेही गंमती करतात कारण ते मेलेले नसतात. असो....

मला शासनाने अमरावतीहून थेट गडचिरोलीला फेकले होते कारण माझे प्रमोशन सहा महिण्यातच होणार होते. शासनालाही वाटले असेल फेका याला लांब, गडचिरोलीला गेला तो कायमही जावू शकतो. कारण ती नक्षल एरिया आहे, हे आपणास सर्वश्रूतच आहे. ‘जिसका कोई नही उसका तो खुदा है यारो...’असे म्हणतात. त्या उक्तिनुसार माझ्या सजीव देहाला प्रमोशन झाल्यानंतर थेट नाशिकला फेकण्यात आले. मी उपविभागीय अधिकारी या पदावर मुख्य अभियंता कार्यालय, उत्तर महाराष्ट्र प्रदेश येथे रूजू झालो. नाशिकसारखे थंड हवेचे ठिकाण पाहून मला अतिशयच आनंद झाला. माझे तेथील ‘साडे चार वर्ष’ कसे गेले हे कळले सुध्दा नाही. पण एक घटना काही कारण नसतांना घडली.

मला रितसर ‘गंगोत्री बंगला’ राहायला मिळाला. तो कान्हेरे मैदानाच्या कोप-यावर आजही अस्तित्वात आहे. बंगला जुना बांधकाम केलेला आहे. त्यातील ‘वरील पिण्याचे पाण्याची टाकी’ जरा विचित्रच होती. बंगल्याच्या बाजूला एक मोठे बदामाचे झाड आहे. त्यावरून नेहमी माकडे त्या पाण्याच्या टाकीचे झाकण वारंवार काढीत असत. ही बाब माझे बायकोला पटली नाही. ती बोलली की, ‘हे झाकण तुम्हीच वर गच्चीवर जा व त्या झाकणावर एखादा मोठा दगड ठेवून या’. मी ते बरेचदा काही शारिरीक ईजा होवू नये या हेतूने टाळत होतो. माझ्याकडे मोरे शिपाई होता पण तो वैयक्तिक कामास तयार होईना. बंगल्याचे मेंटेनन्स ज्या उपविभागाकडे होते, ते सरकारी फंड नाही अशी सबब सांगून, मला सोयिस्करपणे टाळत होते. मग काय एका रविवारी मी ‘बायकोने सांगितलेले विरंगुळात्मक कार्य’ असे समजून एका

स्टूलवर पाय देवून वर गच्चीवर चढलो. काम आटोपले पण उतरतांना डाव्या हाताला कसा झटका पडला, हे तेंव्हा कळले नाही. काही दिवस कमी वेदना असल्याने टाळाटाळ केली आणि तीच मला  भोवली. एक हात खांदयापासून फ्रोजन झाला असे डॉक्टरांचे म्हणणे पडले. मी साधारणपणे पंचेवीसेक वर्षापासून कधीही आजारी पडलो नाही त्यामुळे मला 'वेदनालयात' जाण्याचा कंटाळा आला. पण बायकोने बक-याला बळीसारखे न्यावे त्या प्रकारे मला दवाखाण्यात नेलेच. आता फ्रोजन शोल्डर साठी डॉक्टर म्हणाले ..'काही विशेष मोठी बाब नाही. एक लहानसे इंजेक्शन मागून खांदयाला दयावे लागेल'..... 'आलिया भोगासी असावे सादर' असे समजून मनाची तयारी केली. बायकोनेही लहानसेच ईंजेक्शन आहे, अशी गोड समजून घातली. पण डॉक्टर म्हणाले की, ऑपरेशन थियेटरमध्ये ही क्रिया करावी लागेल.

वेदनेच्या बक-याला एका स्टूलवर बसविण्यात आले. एका सुंदर नर्सने प्रथम कोमल हाताने काही विशिष्ट प्रकारचा द्रव चोपडून खांदयाची जागा सुई टोचण्यासाठी  सावकाश तयार केली. मी मध्येच बोललो....'डॉक्टरसाहेब, सुई लहानशीच आहे ना...जर मोठी असेल तर मला गुंगीचे औषध दया..म्हणजे मला माहित पडणार नाही.'  किंवा मला सविस्तर माहिती दया.

'काळजी करण्यासारखे काहीच नाही. गुंगीची आवश्यकता नसते. आता तुम्ही म्हणताच तर मी थोडी माहिती देतो. प्रथम मी एक पोकळ स्टेन टाकेन व त्यानंतर त्या स्टेनमधून ती सुई घालावी लागेल'....... कोणतीही गुंगी न देता खांदयाचे मागील भागातून खांदयाचे जॉईंटवर प्रथम स्टेन व नंतर ती सुई माझ्या खांदयामध्ये घुसविण्यात आली. 'मला वेदना होत आहे' असे मी बोललो पण त्याकडे दुर्लक्ष करीत त्यांनी मला मागून हातोडीने ठोकून ती स्टेन आंत घुसविली. अशाप्रकारे एकदाची डॉक्टर प्रक्रिया संपली. मला **'दु:खानंद'** झाला.

'साहेब, तूम्हाला सुई पाहण्याची तीव्र ईच्छा होती,...डॉक्टर बोलले... 'ती आता मी पूर्ण करतो.'...... डॉक्टरांनी मला सुई दाखवली ती तब्बल **पांच इंचाची** होती.

'त्यासाठीच तर ती स्टेनमधून टाकावी लागली....डॉ. बोलले...

माझ्या आयुष्यात मी कधी एवढी सुई पाहली नव्हती. पण वेदनालयात आलेला हा अनुभव मला खरोखरच चकीत करून गेला. आता हे तर काहीच नाही. पुढे पहा....

2013 ला मी रिटायर्ड झालो अमरावतीला परत आलो. आता सुखाचे सेवानिवृत्तीचे दिवस सुरू झाले होते. अचानक 2015 मध्ये उजवा हात खांदयामध्ये ‘फ्रोजन’ झाला. मी आधीच या ‘फ्रोजन’ प्रकीयेला घाबरलेला प्राणी आता खंरच ईंजेक्शन घ्यायला तयार होणार आहे काय. मी ते तसेच टाळले. काही दिवस गेल्यावर त्रास वाढत गेला. आता काय करावे काही सुचेना. यावेळी माझे मुलाला हैदराबाद येथे नोकरी लागली. तो बोलला...’पप्पा हैदराबादला या, आपण काहीतरी सुखद असा उपचार करू’.

हैदराबादला एक ‘कादरी’ नावाचे फेमस डॉक्टर आहे, अशी ख्याती मी ऐकली होती. त्यांचेकडे डिग्री वगैरे काहीच नाही पण त्यांचे वडील जापानला जावून बरेच जणांची हाडे सरळ करून आलेली होती. आता मात्र त्यांचा मुलगा हे काम करतो असे आढळले. मला वाटले बिना ईंजेक्शनने जर आपला हात सरळ होत असेल तर हा ही अनुभव घ्यायला काय हरकत आहे. ठरल्याप्रमाणे मी ‘कादरी’ यांचे दवाखाण्यात गेलो. जो पेशंट बाहेर आला त्याने बोलण्यास नकार दिला. आत काय घडले हे त्याने सायिस्काररित्या लपविले. तो एवढेच बोलला की, ‘तुम्ही फक्त आंत जा, तुमचा हात जादूसारखा हे डॉक्टर सरळ करतात. मला जराशी वेगळीच शंका आली पण आता दवाखाण्यात आल्यावर माझा काहीच ईलाज नव्हता.

आंत गेलो तेथे एका मॉनिटरवर काही व्हीडीओ दाखवण्यात आले होते. त्यात फक्त एवढेच दाखवले की.......पेशन्टला ईतर डॉक्टरांनी तीन लाख रूपये सांगितले होते पण या डॉक्टरांनी केवळ साडेतीन हजारामध्ये माझ्या वेदना संपविल्या. या जाहिराती वजा व्हीडिओ कां दाखण्यात येत होता, हे मला कळलेच नाही. असो. थोडयाच वेळात मला मालीश सेंटरमध्ये नेण्यात आले. तेथे दोन आडदांड माणसे होती. त्यातील एकाने माझा कोणता हात फ्रोजन झाला आहे, याची चौकशी केली. लगेच त्या दोघा बलदंड धारकांनी माझा हात, जो दहा अंशही वर जात नव्हता त्यास जास्तीत जास्त ताकतीने जो वर नेला तो सरळ खांदयापर्यंत. मला फार ‘जीवघेण्या वेदना’ झाल्या. पण क्षणात असे ‘अघोरी कृत्य’ करणा-या डॉक्टरांना मनातून शिव्यांची लाखोळी वाहली. अडीच हजार रूपये फी दोन मिनीटाकरीता दिली व बाहेर आलो.

त्यानंतर मात्र त्याने तेलाने हळूवार मालीश करीत माझ्या वेदना जाग्यावर आणण्याचा प्रयत्न केला. आणि मला सांत्वनानिमित्त, छातीपर्यंत बँडेज बांधून व  पंधराशे रूपयाचे मालीश

तेलही आमच्या माथी मारले. अशाप्रकारे माझी त्या हैदराबादच्या वेदनालयातूनही सुटका झाली. मनात म्हटले वा ऽ रे ‘कादरी जगप्रसिध्द जपानला जावून आलेला डॉक्टर’.

आता मी अशा वेदनालयात जाणे टाळतोच व रोज फिरायला जाणे काही योगा वगैरे करणे ईत्यादी नैसर्गिक उपायच पसंद करीत असतो.

---

## 7.वृध्दाची हूशारी- काल्पनिक कथा- बालसाहित्य

एक म्हातारा वयाने पंच्यांशी वर्षाचा झाला. तो जेंव्हा सेवानिवृत्त झाला होता, त्यावेळी त्याला सरकारने ‘तीस लाख’ रूपये दिले होते. त्यास पेंन्शनही मिळत असे. त्याची मुले मोठी झाली होती व त्यांना नोक-या मिळाल्या होत्या. ईकडे हा म्हातारा स्वत:चा गुजारा पेंन्शनमध्येच करायचा. त्याने कधीही मुलांकडून पैशाची अपेक्षा केली नाही. त्याला मिळालेले सर्व तीस लाख त्यांनी फिक्स डिपॉझीट केले होते. जेंव्हा त्याचे वय पंच्याशी झाले होते तेंव्हा त्याचे तीस लाख रूपये आता ऐंशी लाख झाले होते. त्याला वाटले की, आता काही रक्कम काढावी व नातवास भेट दयावी. करीता तो बँकेत काठी टेकवत एकटाच गेला. त्याला डोळयानेही फारसे दिसत नव्हते. त्याला एटीएम वापरता येत नव्हते कारण डोळे खराब झाले होते.

तो बँकेत गेला व दुस-याकडून एक हजार रूपये काढण्याचा फॉर्म भरून घेतला. जसा तो काउंटरवर उभा राहला व त्याचा नंबर आला तेंव्हा बँकेतील एक चतरी मुलगी जी नव्यानेच लागली होती. ती बोलली,’आजोबा तुम्हाला एक हजार एवढी कमी रक्कम काउंटरवर मिळणार नाही. तुम्ही सरळ एटीएम मशीनवर जा आणि पैसे काढा.’किंवा जास्त रकमेचा फॉर्म भरा.

‘बरं मग तुम्ही मला किती रक्कम देवू शकता’..म्हातारा बोलला.

‘तुमची किती रक्कम खात्यात शिल्लक आहे’...ती बोलली

‘तुम्हीच पहा किती आहे ते व मला सर्व रक्कम परत करा, तसेही मला म्हातारपणामुळे वारंवार बँकेत यायला जमणार नाही.’

मुलगी शिल्लक रकमेचा तपशील पाहते  व सांगते की, आपले ऐंशी लाख रूपये जमा आहेत.

'मग मला ती पूर्ण रक्कम दया.'

'पण सध्या आम्ही तुम्हाला एवढी रक्कम देवू शकत नाही कारण तेवढे पैसे बँकेत सध्या नाहीत.'

'मग किती रक्कम देवू शकता'

'मी आज तुम्हाला फार तर दहा लाख रूपये देवू शकते'

'ठीक आहे....द्या ती रक्कम...म्हाता-याला केवळ एकच हजाराची गरज असते....ईकडे बँकेच्या मुलीला वाटते....म्हाता-याला काय कळते. ती पैसे देतांना म्हणते,'आजोबा ही रक्कम येथेच मोजून घ्या, नंतर मी तुमची तक्रार ऐकणार नाही. म्हातारा हूशार असतो. त्याने आधीच नऊ लाख नव्यानव हजाराची डिपॉझीट स्लीप भरलेली असते...ईकडे मुलगी हूशारी दाखवायला जाते व म्हाता-याला काही रकमा काढून दहा लाख रूपये दयायला जाते. म्हातारा काही मोजू शकणार नाही असे गृहीत धरून ती येथेच काउंटरवर मोजण्याचा आग्रह करते.

म्हातारा म्हणतो की काही हरकत नाही मला बँकेवर व तुमच्यावर विश्वास आहे. पैसे मोजण्याची गरज नाही. तो त्या रकमेतील फक्त पाचशेच्या दोन नोटा काढतो व नऊ लाख नव्यानव हजाराची डिपॉझीट स्लीप तिला देवून म्हणतो की, हे माझे पैसे तुम्ही आताच डिपॉझीट करा. मुलगी लगेच आश्चर्यचकीत होते व अचंब्यात पडते कारण तीने काही रक्कम आधीच काढलेली असते. पण तिला ते डिपॉझीट स्विकारावे लागतेच.

मुलांनो कळलं ना... मला या गोष्टीतून काय सांगायचे आहे ते. कधीही कोणाला कमी लेखून स्वत:ला हूशार समजू नये हेच मला या गोष्टीतून सांगायचे होते.

..........................................................................

**8.**मुलीच्या पाहणीचं रहस्य.......... रहस्यमय काल्पनिक कथा

(सर्व पात्राची नावे आणि स्थळ काल्पनिक आहे तथापि हा प्रसंग कोणाचे जीवनाशी जुळत असल्यास तो केवळ योगायोग समजावा.)

स्त्री जीवना तुझी कहानी,<br>
तुझीच राहील मनमानी ।

तू जशी ती दुनिया सारी,
देव तुझ्यासम, तुज कोण टाळी.......।।

आज मृदुला जरा खूषच होती... तीला पहायला पहिल्यांदाच कोणीतरी पाहूणे येणार होते. पाहूणा म्हणून येणारा मुलगा कसा असेल, याचा ती मनातल्या मनात विचार करीत होती. ती अर्थशास्त्रात पारंगत झाली होती व तीचे डि. टॅक्सचे फायनल वर्ष होते. तसं तीचं लग्नाचं वय झालं नव्हतं पण मुलीची जात, त्यामुळे लवकरच लग्न जुळलं तर फारच उत्तम, या विचाराने तिच्या पप्पाने पाहूण्यांना पहाणीसाठी होकार दिला होता.

पाहूण्यांची येण्याची वेळ दुपारी दोन वाजताची ठरली होती. दिवस होता 20 फेब्रुवारी 2005. ही तारीख येणा-या मुलाने म्हणजे सचिनने मुद्दामच ठरविली होती कारण या दिवशी त्याचा वाढदिवस होता.तो अगदी जवळच्या मित्राजवळ गेला आणि म्हणू लागला......
"काय रे अमोल, आज तसाही रविवारच आहे आणि माझा वाढदिवस पण आहे तर आपण हा वाढदिवस वेगळया प्रकारे साजरा करूया कां"............अमोल आश्चर्यचकीत झाला व बोलला...

"असं काय विशेष करणारआहेस तू आजच्या दिवशी?

अरे आज विशेषच आहे. आज मी मुलगी पहायला जायचे ठरविले आहे. तारीख पण मी मुद्दामच ही घेतली आहे तेंव्हा तू लवकर तयारी कर कारण आपल्याला दोनपर्यंत अमरावतीला पोहोचायचे आहे. आऽरे ,शहरातली मुलगी आहे आणि ते ही ईंजिनिअरची. जावून तर पाहू. आज नेमक्या वाढदिवसाच्या दिवशीच आपलं नशीब अजमावून पाहू म्हणतो.

पाहणी पहिल्यांदा असली की, प्रथम आई वडील मुलाला व मित्रालाच पाठविण्याची प्रथा आहे या विदर्भात. दोघेही मारूती व्हॅन घेवून अमरावतीला जातात. जातांना ठरल्यापेक्षा अर्धा तास उशीर होतो.

तिकडे मृदुलाचे वडील येणा-या पाहूण्यांसाठी पूर्ण तयारी करतात व वाट पहात असतात. 2.30 वाजता पाहूणे येतात. पाहतो तर फक्त मुलगा आणि त्याचे मित्रच व्हॅनमध्ये दिसतात. मुलीची तयारी पण झालेली असते.मुलीला संभाव्य प्रश्नांची उत्तरे तिच्या आईने समजावलेली असतात आणि विशेष म्हणजे अवांतर काही मोकळेपणाने बोलू नकोस हे पण तिच्या आईने

समजावलेले असते. मृदुला ही अतिशय मोकळया स्वभावाची असते. तीला कोणतीही गोष्ट लपवून ठेवण्याची सवय नसते. जे बोलायचं ते अगदी मोकळेपणाने मग त्याचा परीणाम काहीही होवो.

बैठक बसलेली असते. मुलीला ठराविक प्रश्न विचारल्या जातात. त्यानंतर काही प्रश्न मुलीच्या वडिलांनी मुलास विचारावे अशी अपेक्षा ठेवून, नवरा मुलगा प्रतिक्षेत असतो पण मुलीचे वडील आलेल्या पाहूण्या मुलास काहीच विचारत नाहीत कारण ते जरा मितभाषी असतात. शिवाय मुलगा दिसायला सुंदर असल्याकारणाने, विशेष प्रश्न विचारण्याची त्यांना गरज वाटत नाही. पुढील बैठकीत विचारू, असे ते मनोमन ठरवतात. त्यामुळे नव-या मुलास थोडसं आश्चर्य पण वाटतं. तो विचार करतो की आपण दिसायला सुंदर असून सुध्दा इंजिनिअर साहेबांनी कोणतेही प्रश्न कां विचारले नाहीत . आपल्यात काही कमी पणा तर त्यांना आढळून आला नसेल..........असा विचार त्याचे मनात चालूच होता.

प्रश्न संपले असं गहीत धरून पाहूण्यांनी मृदुलाला जायला सांगितले पण मृदुला मोकळया स्वभावाची असल्याने, तीने नव-या मुलाकडे धडधाकट नजरेने पाहून व सचिनचे मित्राकडेही सरळ नजर मिळवून म्हटले की , घरात जाण्यापूर्वी मला एक गोष्ट स्पष्टपणे याच बैठकीत सांगायची आहे,ती अशी की, माझे माझ्या मित्रावर अतिशय प्रेम आहे. आणि तो आमच्या फ्लॅटमध्येच राहतो तेंव्हा जर तुम्हा दोघांची संमती असेल तर मी आताच त्याला तुमच्या समोर बोलावून घेतो म्हणजे तो तुम्हास पाहील व मला लग्नासाठी निर्णय घेणे सोयीचे होईल.

असे एकल्याबरोबर, मुलीला पाहण्यासाठी आलेला पाहूणा मुलगा व त्याचा मित्र एकमेकाचे चेह-याकडे आश्चर्याने पाहू लागले. तसा त्यांचा चेहरा पांढरा फटक झाला होता. पण मुलीच्या स्पष्टतेपुढे त्यांचा काही ईलाज नव्हता.

दोघांनीही क्षणभर विचार केला आणि म्हटले ..........."नाही नाही तसं काही नाही आपण अतिशय स्पष्ट वक्त्या आहात व आपली गुणवत्ता पण आमच्या पेक्षा जास्त असल्यामुळे असा स्पष्टपणा लग्नाआधीच सांगितलेला बरा असतो".

मृदुला मनोमन खूप हसली........तीचं हास्य थोडं ओठाबाहेरही आलं होतं.........

तर मग मी त्याला लगेच बोलावते कारण तो माझ्या फ्लॅटमध्ये, खालीच ग्राउंड फ्लोअरला राहात असतो. ती लगेच तीच्या पपांना म्हणते ...."पप्पा त्यास फोन करा'....

पप्पा बोलले ....."अगं कशाला त्याला तू या ठिकाणी बोलावतेस"?

"नाही नाही प्रतिकला बोलवाच तो माझा जिगरी दोस्त आहे"मृदुला बोलली ....... "त्याचे शिवाय मी लग्नाचा निर्णयच घेवू शकत नाही. मग नाईलाजाने इंजिनिअर साहेब प्रतिकच्या वडीलांना फोन करतात व म्हणतात की .........."अरे नितीन, तुझ्या मुलाला प्रतिकला माझ्या फ्लॅटमध्ये चहा पोहे खायला पाठव. आमचे कडे मृदुलाच्या पाहणीसाठी पाहूणा मुलगा
सचिन आला आहे.

क्षणभ-यात प्रतिक वरच्या फ्लॅटवर येतो. आणि पाहूण्यांकडे टक लावून बघतो.
आणि काय आश्चर्य पाहूणा मुलगा आश्चर्यचकीत होवून जोरात हसतो........
आणि म्हणतो हा तुमचा मित्र आहे कां..........फार गोड मित्र आहे हो तुमचा........
वाचकहो,........ हसण्याचं कारण तुम्हाला कळणार नाही कारण मृदुलाचा जिवलग मित्र प्रतिक हा केवळ सात वर्षाचा मुलगा असतो..............
आणि मृदुलाचे लग्न सचिनसोबत दिनांक 11.05.2005 ला सुखरूप पार पडते. आज दोघेही अतिशय आनंदात व अपार सुखात वावरत आहेत............
समाप्त.
************************

## 9.मृतात्म्याचा फ्लॅट

"Death ends a life, not a relationship".- Mitch Albom

घटना तशी जुनीच पण आपणास, आजही ती ताजीच वाटेल. सन 1990 च्या दरम्यान मी अकोला येथे गोरक्षण रोडवर एक नवीन फ्लॅट घेतला होता. त्यापैकी माझ्यासमोर एक A-6 नंबरचा गाळा होता. तो एका ख्रिश्चन मिशनरीच्या फादरच्या नावावर होता. फादर असल्याने एकटाच हे वेगळे सांगायला नको. कालांतराने तो पुण्याला राहायला गेला. त्याचे काही जुजबी सामान त्यामध्येच ठेवून तो गेला होता. हा फ्लॅट एका वकीलाने भाडयाने घेतला. दोन वर्ष हा वकील येथे भाडयानेच राहला. पण दुर्दैवाने या कालावधीत त्या फादरचा मृत्यू झाला. सर्व ओरि जीनल कागदपत्रे त्याचेजवळच होती व ती गहाळ झाली होती. आता तेथे राहाणारा भाडेकरी हा चांगला स्वभावाचा असल्याने त्यांनी खूप चौकशी केली पण कोणीही क्लेम करणारा व्यक्ति आढळला नाही.

सध्या परिस्थिती अशी आहे की, हा "मृत्युनंतरचा फ्लॅट" कोणाचेही नावे होवू शकत नाही त्यामुळे अर्थातच या वकीलाने भाडे कोणाला दयावे असा प्रश्न निर्माण झाला व

अनायासेच भाडे देण्याची प्रक्रिया बंद पडली. आजही त्याचे मेंटेंनन्स हा भाडेकरी भरत आहे व अशा फ्लॅटचा उपभोग घेत आहे.

घटना जराशी विचित्रच आहे. वकील भाग्यवान आहे पण असा फ्लॅट त्यांना नावावर करून घेता येणे शक्य नाही. म्हणजेच थोडक्यात स्वत:चा मृत्यू होतपर्यंत तेथे यांच्यापैकी कोणालाही राहाता येवू शकते. फादर हा धार्मिक व्यक्ति असल्याने कोणताही अनुचित प्रकार अजून तरी घडला नाही.

आता या गोष्टीला भाग्य म्हणावे की अडचण. "ना मलाही ना तुलाही" अशी अवस्था झाली आहे. काहीही असो पण या वकीलांनी त्या फादरला जीवंतपणी खूपच उपकारात्मक मदत केली होती. हेच या घटनेतील वैशिष्टय होय. म्हणूनच मी वरील इंग्रजी वाक्य या घटनेसाठी वापरले आहे.

"Death ends a life, not a relationship".- Mitch Albom

धन्यवाद !

**********************

## 10.मृत्युची तारीख भयकथा (अध्यात्मिक)

Romans 14:8

**"If we live, we live for the Lord; and if we die, we die for the Lord. So, whether we live or die, we belong to the Lord."- The Holy Bible**

मृत्यु हे एक असे सत्य आहे की, ते कोणालाही टाळता येत नाही. याची भिती प्रत्येकालाच असते. विज्ञान कितीही प्रगत होत असलं तरी अजून तरी ते, या बाबीची निश्चितता ठरवू शकली नाही. मृत्युची तारीखही कोणास माहित होत नाही. जर ती माहित असती तर त्याला रोकण्याचे उपाय विज्ञानाला करता आले असते. बरं एकदा मृत्यु झालेल्या माणसाला परत जिवंत करण्याचे तंत्रही अद्दयाप उपलब्ध नाही तरी आपल्यातले काहीजण ठामपणे म्हणतात की या जगात ईश्वर नाहीच.

"आत्म्याचं अस्तित्व", हा एक वादाचा विषय असल्याने तो थोडा वेळ मी बाजूला ठेवतो. पण जे लोकं ईश्वरावर विश्वास ठेवत नाही ते सुध्दा सध्या नाकाला मास्क बांधून फिरतांना आढळतात. म्हणजे थोडक्यात या जीवनावर त्यांचं अतिशय प्रेम आहे.

याबाबत एक लहानशी गोष्ट मी पाहलेल्या सिनेमावरून सांगतो. व त्यानंतर मी मृत्युच्या तारखेची चर्चा करणार आहे. याच कारण असं आहे की, मी जे लिखाण नेहमी मृत्युवर करीत आलो आहे त्याला खूप वाचक मिळाले आहेत. याचाच अर्थ मृत्यु, कोणाचाही असो त्याबाबत लोकांना उत्सुकता व कुतूहल आहे हे सिध्द होते.

तर गोष्ट अशी की, मी एकदा "मृत्यू" नावाचा हिंदी चित्रपट पाहला होता. त्यामध्ये एका माणसाचा मृत्यू जवळ येतो. यमराज रात्रीला घरात येतात व त्याला सांगतात की तुझी वर जाण्याची वेळ झाली आहे तेंव्हा त्वरीत तयारी कर. पण तो तयार नसतो व यमराजाला म्हणतो की मला फक्त एक वर्ष चान्स दया कारण माझ्या मुलाचे लग्न व्हायचे आहे. ते एकदाचे आटोपले की, मी स्वत: तुमच्यासोबत येईल. मग काय मुलाचे लग्न आटोपते व तो बरोबर एक वर्षाने त्याचे घरी येतो. हं आता आठवलं या पिक्चरमध्ये सईद जाफरी होता.

यमराज आले आणि म्हणाले... "चला आता, वेळ झाली आहे. तर तो लगेच म्हणतो....."मला पुन्हा एक वर्षाची सवलत दया."

" आता काय उरलं तुझं?" यमराज बोलले.

नाही फक्त एक काम राहलं आहे. माझ्या मुलाचे लग्न झाले आहे त्याचे एक मूल पाहण्याची माझी ईच्छा आहे.

हे ऐकून यमराज म्हणतात,... "मला असा अधिकार नाही पण तू म्हणतोच तर मी फक्त तीन चान्स देवू शकतो. एक अगोदरच झाला आहे व दुसरा हा, पण तिस-या चान्सच्या वेळी मात्र तुझ्या हाताने एक खून होण्याची शक्यता आहे.

तेंव्हा तो म्हणतो.. "ते मी पाहून घेईन."

यमराज त्याला यावेळी ही सोडतात. आता मात्र त्याच्या डोक्यात वेगळेच

विचार येतात की, नाहीतरी माझ्या हाताने एक खून होणारच आहे तर जर मी या यमराजाचाच खून केला तर. बस एक वर्ष लगेच निघून जाते व हा त्या पर्टीकुलर तारखेला चाकू घेवून यमराजाची त्या तारखेची वाट पहात असतो.

वेळ रात्री बाराची असते. सेकंदा सेकंदाची हा वाट पहात असतो. आणि ठिक बारा वाजता दाराची बेल वाजते. यमराजाला त्याच्या या विचाराची आधीच कल्पना आलेली असते, त्यामुळे तो यावेळी त्याचे बायकोचे रूपात येत असतो. दार उघडल्या बरोबर हा चाकू सरळ यमराजाच्या पोटात खूपसतो. तो त्याची बायको मृत्यू पावलेली असते. मग यमराज प्रकट होतो व म्हणतो... "पहा बरं तुला सांगूनही, तू तुझ्या बायकोचा खून केला आहेस. चल आता... तुझा मृत्यु अटळ आहे.

सांगण्याचं तात्पर्य असे की, मृत्युची तारीख ही निश्चित आहे.

आता तुम्हाला प्रॉमिसप्रमाणे मी तुमच्या मृत्यूची तारीख सांगणार आहे. पण घाबरू नका बरं...एकदा मनाची पक्की तयारी असेल तरच, ही तारीख पहा.

ईंटरनेटवर Deathclock.com ही एक पूर्वी फनसाईट होती. त्यावर तुम्हास पंचेवीस प्रश्नांची खरी उत्तरे दयावी लागत होती. त्यामध्ये प्रामुख्याने जन्मतारीख, वय, वजन, सवयी मग सवयीमध्ये तुम्ही सिगारेट किती पिता, बाहय सेक्स किती वेळा करता वगैरे पण ती साईट सध्या बंद झाली आहे. त्याऐवजी आता deathclock.org ही साईट उपलब्ध आहे. आणि प्रश्नांची संख्या अतिशय कमी आहे. ही एक हेल्थ ऑर्गनाझेशन असल्याने, यावर तुम्हास अंदाजे तारीख कळविण्यात येते. ही सरासरी मृत्युदर आकडेवारीवर अवलंबून असल्याने सगळयांचेच आयुष्य साधारणपणे 75 ते 80 च्या वरच दर्शविते. आणि यात अचानक होणा-या अपघाताचा मात्र उल्लेख नसतो हे विशेष.

तर आपण मानसशास्त्र दृष्टया सशक्त असल्यास, या मृत्युच्या तारखेचा प्रयोग करून पहा. नाहीतर माझ्या कथेला उत्तम पण भयकथा मनोरंजनाचे पाच स्टार दया.

"Happy Long life to all my readers." and have a good day.

Thanks for your regular support to my all contents on "Pratilipi" App.

**********************************

11.मृत्युची भिती....वैचारीक लेख अध्यात्मिक

थोरांच्या विचारांचे समीक्षण

मार्च महिण्यापासून कोरोना आपल्या परिसरात आला आहे तेंव्हापासून सर्वांनीच मरणाची धास्ती घेतली आहे. या सृष्टितील करोडो जीवांना मृत्युची भिती वाटत असते. मग ते कृमी, किटक, जलचर, उभयचर वा मनुष्य प्राणी असो. साप कितीही विषारी असला तरी तो मानवाला पाहून बिळात पळतो. पक्षी प्राणी स्वत:ला हात लावू देत नाही. हे सर्व मरणाच्या भितीमुळेच. डॉ. जगदीशचंद्र बोस यांनी लावलेल्या शोधानुसार वृक्षवल्ली यांना सुध्दा जीव असतो, हे सिध्द केले आहे. पण मानवाच्या बाबतीत विचार केल्यास, मानव हा सर्जनशील प्राणी असल्याने त्याला मृत्युची मानसिक भिती ही सर्वाधिक सतावीत असते. या अशा रहस्यमय मृत्युबाबत थोरांचे व तत्वचिंतकांचे काय मत आहे, ते या लेखात पाहण्याचा माझा मानस आहे.

"The fear of death follows from the fear of life. A man who lives fully is prepared to die at any time."- Mark Twain

म्हणजेच मार्क ट्वेनच्या म्हणण्यानुसार, जीवन जगण्याच्या भितीमुळे किंवा अनुषंगाने मृत्युची भिती वाटत असते. जो मनुष्य परिपूर्ण जीवन जगतो, तो कोणत्याही वेळी आलेल्या मृत्युसाठी तयार असतो. तसेच मार्क ट्वेन पुढे म्हणतो मी मृत्युला भित नाही कारण जन्मापूर्वी मी अब्जोवेळा मरण पावलो आहे. व त्यापासून मला कोणतीही असुविधा जाणवली नाही.

Ref:- www.azquotes.com- I do not fear death. I had been dead for billions of billions of years before I was born, and had not suffered slightest inconvenience from it.

या जगातला महान भौतिक शास्त्रज्ञ अल्बर्ट आइनस्टाईन म्हणतो सर्वात अन्यायकारक भिती असेल तर ती मृत्युची भिती. फ्रान्सिस बेकॉन म्हणतो, लहान मूल जसं अंधाराला भितं, तसा माणूस मृत्युला भितो व मग मुलांमध्ये अशी नैसर्गिक भिती अनेक गोष्टींमुळे वाढत जाते.

मूळ वाक्य असे... Men fear death as children fear to go in the dark, and that natured fear in children is increased by tales, so is the fear. यापुढे जावून हेन्री डाईक म्हणतो...."काही माणसं मृत्युला ईतक भितात, की ते जगण्याला सुरूवातच करीत नाहीत."

आता स्वामी विवेकानंद मृत्युबाबत काय म्हणतात ते पाहू.

ज्या दिवशी माणसाला कळतं की, आपणास खराखरंच मृत्यु नाही, त्या दिवशी त्याचा आत्मा मृत्युनंतरही चिकटून कार्यरत (persist) राहतो. मग त्यास मृत्युची भिती वाटण्याचा प्रश्नच उदभवत नाही.

सॉक्रेटीस (मृत्यु ई.स.पूर्व 399) हा महान ग्रीक फिलॉसाफर होता. त्याचे म्हणणे असे होते की, मृत्युला भिणे म्हणजे स्वत:ला हूशार समजणे होय जेंव्हा की तो हूशार नसतो. त्यासाठी आपल्याला हे माहित हवं की, आपल्याला काहीच माहित नाही. कारण हे कोणालाच माहित नाही की, कदाचित मृत्यू हा मानवाला मिळालेला सर्वात मोठा आशिर्वाद होय. आणि तरी ते भितात जणूकाही, त्यांना निश्चित माहित आहे की, मृत्यु ही वाईट घटना आहे.

Ref:- मूळ वाक्य असे..... "To fear death is nothing other than to think oneself wise when one is not. For it is to think one knows what one does not know. No one knows whether death may not even turn out to be the greatest blessing of human being. and people fear it as if they know for certain it is the greatest evil."- Socrates

आता माझं मत.....हिंदू धर्मातील अध्यात्मशास्त्रानुसार, ज्ञान आणि कर्म हे आपल्यासोबतच राहाणार आहे. जशी रात्र संपल्यावर सूर्य उगवतो व दुसरा दिवस उजाडतो अगदी त्याचप्रमाणे माणसाच्या मृत्युनंतरही जीवन व कर्म परीणाम पुढे सुरूच राहाणार आहे. तेंव्हा मृत्युची भिती कायमस्वरूपी सोडा व ज्ञान आणि सत्कर्मास त्वरीत सुरूवात करा.

लेखाचा शेवट करतांना, मी आपली पवित्र गीता काय सांगते हे सांगून हा मृत्यवर लिहिलेला महत्वाचा लेख संपुष्टात आणतो.

"वांसासि जीर्णानि यथा विहाय, नवानि गृह्यांति नरोऽपराणि ।

तथा शरीराणि विहाय जीर्णा, न्यन्यांनि संयाति नवानि देही" ।। अ.2/श्लोक22 ।।

धन्यवाद.

लेखक:- प्रकाश माणिकराव राऊत अमरावती दि. 30.06.2020

---

## 12.मृत्यू आणि कर्ज- धक्कादायक कथा- काल्पनिक

(टीप:-हे कथानक पूर्णपणे काल्पनिक असून या घटनेचा कोणाशी संबंध जुळून येत असल्यास तो केवळ योगायोग समजावा.)

“Our life is a loan received from death with sleep as the daily interest on this loan.”— Arthur Schopenhauer

‘मॅडम, तुम्हाला जवळपास ‘पस्तीस हजार रूपये’ तरी या महिण्यात भरावेच लागेल, अन्यथा आमच्या को-ऑपरेटीव्ह बँकेला, तुमच्या शासनातून मिळणा-या अनुकंपा तत्वावरील वेतनातून ही रक्कम कापण्याची नोटीस पाठवावी लागेल.’

हे त्या बँकेच्या साहेबाचे वक्तव्य ऐकून ‘अनया’ आश्चर्यचकीतच झाली. ती एक विधवा बाई आहे. तिचा नवरा मरून जवळपास आजपर्यंत आठ वर्षे झाली होती. तिला जराही कल्पना नव्हती की, आपल्या माघारी नव-याच्या मृत्युपूर्वी नेमके काय घडले होते.

मी तिच्याच ऑफीसमध्ये अभियंता या पदावर कार्यरत होतो. तीचे शिक्षण फक्त मॅट्रीक पर्यंतच झाले होते. तिला एवढया कमी गुणवत्तेवर आणखी कोणती चांगली नोकरी मिळणार होती. शासनात नवरा जर कार्यरत असेल आणि त्याचा मृत्यु अचानक झाला असेल, तर त्याचे बायकोला ‘अनुकंपा तत्वावर’ अशा नोक-या त्या काळात देण्यात येत होत्या. आज त्या सुध्दा सवलती शासनाने बंद केल्या आहेत.

कर्जाचा हा धक्का कां व कसा बसला याची चौकशी मी, तिला मदत करण्याचे हेतूने केली. तिचा नवरा ‘सुहास’ हा पाटबंधारे विभागातच साध्या क्लर्क पदावर कार्यरत होता. त्याचा मित्र सुरेश हा मदयपी आहे. दोघांची मैत्री ईतकी चांगली होती की ते दोघेही एकमेकासाठी कोणतीही मदत करण्यास तयार असत. एके दिवशी सुरेशला पैशाची गरज भासते. सुहास लगेच

पैसे देण्यास तयार होतो. मद्दय धुंदीत सुहास एका को-ऑपरेटीव्ह बँकेचे फक्त ‘पाच हजार रूपये’ कर्ज काढतो. ही बाब मात्र दारूच्या धुंदीत ठरली असल्याने सदर बाब ही सुहास घरी सांगत नाही. काही काळ गेल्यानंतर दारूची नशा व संवय दोघांचीही वाढतच जाते. एक दिवस अचानक ‘सुहासचा’ मृत्यू होतो. जिगरी दोस्ताच्या मृत्युनंतरही सुरेशने सुहासकडून घेतलेल्या कर्जाची माहिती, सुरेश लपवून ठेवतो. व त्यावर हा असा आठ वर्षाचा काळ निघून जातो.

को-ऑपरेटीव्ह बँक या कर्जाची जराही चौकशी करीत नाही. पण तेथील स्टाफला याची जाणीव तब्बल आठ वर्षांनी होते. पांच हजाराचे कर्ज व्याज धरून पस्तीस हजार होते व त्याची नोटीस अलीकडे ‘अनयाला’ आठ वर्षांनी मिळते.

आता काय करावे....कारण तिला तर फक्त शिपायाची नोकरी मिळाली असते. तिचा पगार केवळ सहा हजार असतो. तिच्याजवळ पुरेशी शिल्लक पण नसते. अशा परिस्थितीत ती माझ्या कडून मदतीची अपेक्षा करते. मला ही थोडा पेचच पडतो. मी ही गोष्ट जेंव्हा माझ्या साहेबांना सांगितली तेंव्हा त्यांनी पण काही मदत करून आपण तिचा प्रश्न सोडवू असे ते म्हणतात.

तिला आम्ही दोघांनीही चार चार हजार रूपये देवून मदत केली. उरलेले पैसे तिने मॅनेज केले. मी आणि अनया दोघेही बँकेत गेलो व बँकेतील साहेबांना तिच्या परिस्थीतीची जाणीव दिली. त्यांनी म्हटले,’ एकदम रक्कम भरत असाल तर मी तुम्हास पांच हजारापर्यंत सूट देवू शकतो. पस्तीस हजाराचे कर्ज तीस हजार भरून आम्ही तिला कर्जमुक्त केले. कबीरांच्या कथनानुसार ‘नेकी कर और कुऐमे डाल” असे समजून मी ही गोष्ट कालांतराने विसरलो.

तीन वर्षानंतर मला एक साडेचार लाखाचा फ्लॅट घेण्याचा योग आला. त्यावेळी मात्र मला शेवटचे पांच हजार देण्यासाठी अडचण आली होती. तेंव्हा मी सहजच अनयाकडे गेलो व मदतीची अपेक्षा केली. तिने अडीअडचणीत असून सुध्दा मला त्यावेळी चटकन मदत केली. वास्तविक मी आणि साहेबांनी दिलल्या रक्कमा अनयाने तेंव्हाच काही काळानंतर वापस केल्या होत्या.

सांगण्याचे तात्पर्य एवढेच की, आपण जर कोणाला मदत केली तर आपल्यालाही कोणत्या माध्यमातून मदत मिळत असते कारण आपण कोणावर केलेले उपकार हे ती व्यक्ति

विसरत नसते. म्हणूनच 'द सिक्रेट' या '-हांडा बर्न' लिखीत पुस्तकात नमूद केले आहे की, कोणाचेही उपकार कधी विसरू नये. ईतकेच काय पण, आपल्या सभोवताली असणा-या झाडे, प्राणी, नदी, पहाड ईत्यादी वस्तूंचे आपल्यावर उपकार असतातच, आपण सर्वांनी ही जाणीव असू दयावी व त्यांचे उपकार कधीही विसरू नये. हेच मला या लहानशा कथेतून सांगायचे होते.

---

## 13.मृत्यूचा अनुभव- वैचारिक लेख- विज्ञान कथा- Psycological Thriller Story

माणसाचा 'जन्म आणि मृत्यू' हया अटळ अशा गोष्टी आहेत. जन्मापूर्वी व मरणानंतर आपले किंवा आपल्या 'वाटण्याबाबत' नेमके काय होत असावे याचे आकलन काही प्रमाणात होण्याचे दृष्टीने आजपर्यंत विविध शास्त्रज्ञांनी विविध मुलाखती घेतलेल्या आहेत. 'सायंटीफीक अमेरिकन' या मासिकातही काही नोंदी लिहून ठेवलेल्या आढळतात. तर अशा मृत्युजवळच्या अनुभवाबाबत काही संकलनात्मक माहिती सांगण्याचा आज माझा मानस आहे. चला तर या गूढ अशा रहस्यात काय दडले आहे ते.

'अर्नेस्ट हेमिंगवे' या लेखकाचे नांव आपण ऐकले असेलच. याने एक लहानशी कादंबरी लिहिली होती त्याचे नाव होते 'द ओल्ड मॅन ॲन्ड द सी' (The Old man and the sea.) ही कादंबरी मी माझ्या ईंगजी साहित्याच्या अभ्यासक्रमात अभ्यासलेली होती. या कादंबरीत तो एका माणसाने केलेल्या शेवटपर्यंतच्या मोठया माशाला पकडण्याचे व मृत्यूपर्यंत झुंज देण्याचे वर्णन केले होते. थोडक्यात शेवटी त्या माशाचा व या माणसाचा मृत्यू होतो अशी ती कहाणी होती. या कादंबरीचे मराठी रूपांतर सुध्दा 'एका कोळीयाने' या पुस्तकात आपणास आढळेल. अशा अनेक कहाण्या त्यांनी त्यांचे जीवनात लिहिल्या होत्या. व ते एक जगप्रसिध्द लेखक झाले होते. हे जेंव्हा तरूण होते तेंव्हा त्यांनी एकदा, पहिल्या जागतिक युध्दात झालेल्या स्फोटात झालेल्या जखमांचे वर्णन न करता त्यांनी मृत्युचा अनुभव कसा होता याचे वर्णन लिहून ठेवलेले आहे. ते म्हणतात,' मृत्यू ही अगदी साधी गोष्ट आहे. मी मृत्यूला पाहले आहे. मला खरोखरच माहित आहे की, मी जर मेलो असतो तर माझ्यासाठी ती एक सुखावह गोष्ट होती. अगदी सुखावह की, मी जीवनात अशी कोणतीच गोष्ट करू सहजपणे करू शकलो नसतो.

**("A young Ernest Hemingway, badly injured by an exploding shell on a World War I battlefield, wrote in a letter home that "dying is a very simple thing. I've looked at death, and really I know. If I should have died it would have been very easy for me. Quite the easiest thing I ever did."- Ref:- Scientific American Journal.)**

काही वर्षानंतर त्यांनी हा असा मृत्यूचा अनुभव त्यांचे "The Snows of Kilimanjaro," या लघूकथेत लिहिला होता. त्यांनी लिहिले की, मी जेंव्हा मृत्यू पावत होतो त्यावेळी मला घ्यायला स्वर्गातून एक विमान आले होते, त्यांनी मला माझ्या जखमी शरीरातून अलगद उचलले व मला वर ते घेवून गेलेत. अशा प्रकारचे अनुभव जवळपास एकशे बावीस लोकांचे आतापर्यंत नोंदविण्यात आले आहेत. प्रत्येकाचे कथन असे ठरते की, मृत्यूनंतर माणसाला अगदी सुखावह असे अनुभव येतात. आपण आपल्या दु:खातून मुक्त होत असतो.

मृत्यूनंतर आपल्याला विमानाद्वारे आकाशात 'प्रकाशाच्या प्रदेशात' नेण्यात येते व तेथे आपल्याला अगदी शांत असा अनुभव येत असतो असा दावा सायंटीफीक अमेरिकन या मासिकामध्ये नोंदविला गेला आहे. ज्यांना या बाबत अजून उत्सुकता असेल त्यांनी NDE म्हणजे Near Death Experiences असे शब्द इंटरनेटवर टाईप करावे व या गूढ गोष्टीचा आनंद घ्यावा. पण कृपया लक्षात घ्या न घाबरता अशा साईट्स पहाव्यात अन्यथा घाबरूनच 'भलते सलते' काही घडू शकते याची मी आपणास चेतावणी देतो. अशा अनेक अभ्यास पुर्ण साईट्स आहेत की ज्या तुम्हाला तुमच्या मृत्युची तारीखही सांगतात. पण आपण यावर भरवसा ठेवू नये कारण त्या सर्व सरासरी प्रश्नांवर आधारीत तयार केलेल्या असतात.

काहीतरी वेगळे वाचकांना वाचावयास मिळावे एवढाच काय तो माझा हेतू यामागे आहे, हे विसरून चालणार नाही. आपण मनाने अगदी खंबीर असाल तर Deathclock.com ही वेबसाईट ट्राय करा. मजा येईल. धन्यवाद !

******************************

## 14.मुलांचा मोबाईल- बालसाहित्यकथा

"लोभाने बालकांचे नुकसान होत असते".- प्रकाश राऊत

बालमित्रांनो, आज मी तुम्हाला एक मजेदार गोष्ट सांगणार आहे. ती आपण काळजीपूर्वक वाचावी व त्याची अंमलबजावणी करावी, अशी आशा आहे. आणि महत्वाचे म्हणजे माझी गोष्ट तुम्हास जर आवडली तर, कमेंट बॉक्समध्ये जरून प्रतिक्रीया दयावी.

एकदा एक बालक आईवडिलांच्या चोरून मोबाईल पाहत असतो. त्याचे आईवडिल त्यास मोबाईल पाहण्यास मनाई करतात. मग तो एक दिवस मोबाईल घेवून पळून एका तळयाचे काठावर जातो व झाडावर बसून मोबाईल पहात बसतो. ईतक्यात काय होते की, त्याचा मोबाईल त्याचे हातातून निसटतो व तलावाचे पाण्यात पडतो. जसा मोबाईल पाण्यात पडतो तसा त्या तलावातून एक देवी बाहेर येते. तिच्या हातात एक सोन्याचा मोबाईल असतो. ती त्या बालकाला विचारते की... 'हा तुझा मोबाईल आहे काय?'

त्याने वर्गात एकदा लाकूड तोडयाची गोष्ट एकलेली असते. त्यामुळे त्यास वाटते की, आपण खरेच बोलावे म्हणजे देवी आपणास हा सोन्याचा मोबाईल देईल. ही गोष्ट त्या मुलाचे लक्षात असल्याने तो म्हणतो की....' हा सोन्याचा मोबाईल माझा नाही, असे खरे बोलतो. देवी चटकन पाण्यात बुडी मारते व दुसरा मोबाईल जो चांदीचा असतो तो घेवून येते आणि बालकास विचारते की....... 'हा चांदीचा मोबाईल तुझा आहे काय' तेंव्हाही हा बालक खरेच बोलतो व म्हणतो की...... 'हा चांदीचा मोबाईल पण माझा नाही'.

देवीला आश्चर्य वाटते की, बालक खरंच प्रामाणिक आहे. मग तिस-यांदा ती देवी त्याचा खरा अँड्रॉईड मोबाईल आणते व विचारते की..... 'हा मोबाईल तुझा आहे काय?'... बालक खरे उत्तर देतो व म्हणतो की ....'होय देवी हा माझाच मोबाईल आहे.' देवी त्या बालकावर खूप खूष होते व म्हणते की ....थोडावेळ थांब ... मी लगेच पाण्यात बुडी मारते व एक साधा आठशे रूपयेवाला मोबाईल आणते व त्या बालकास दयायला जाते तेंव्हा तो बालक म्हणतो ....'हे देवी माते, हा माझा मोबाईल नाही तो तू आधी आणलेला अँड्रॉईड मोबाईल माझा होता. मी ईतका

प्रामाणिक पणे आतापर्यंत तुझ्याशी वागलो त्यामुळे मला तो सोनेरी व चांदीचा व माझा असे तीनही फोन दे म्हणजे माझे आईवडील खूश होतील.

त्यावर देवी म्हणते ….'बालका तुझे म्हणणे अगदी खरे आहे. तू खरंच तिनही मोबाईलसाठी पात्र आहेस. पण मला असे वाटते की, जर मी तुला सोन्याचा मोबाईल दिला तर तुझे आई-बाबा तो तुझ्यापासून हिसकावून घेतील व तुला मोबाईल पाहता येणार नाही. ते सोन्याचा मोबाईल बाजारात विकून टाकतील. दुसरे असे की जर मी तुला चांदीचा मोबाईल दिला तर तुझी ताई त्या चांदीचे स्वत:चे पायासाठी पैंजण तयार करेल व तुला त्याही मोबाईलचा फायदा होणार नाही. आता प्रश्न उरला तुझ्या अँड्रॉईड मोबाईलचा. तर तोही मी तुला देवू शकत नाही कारण तू त्या फोनवर नेहमी चोरून लपून कार्टून पाहात असतो. बाळा….. आता हे तुझे अभ्यासचे दिवस आहेत कारण आता तुझ्या शाळा सुरू झाल्या आहेत. तेंव्हा मी तूला हा साधा एक आठशे रूपयेवाला मोबाईल देतो. तो तुला शाळेतून आई वडिलांना कॉल करण्यासाठी उपयोगात येईल. माणसाजवळ मोबाईल असावा पण त्याचा दुरूपयोग होवू नये, हे आपण लक्षात ठेवले पाहिजे. मोठी माणसे 'महागडा मोबाईल' यासाठी वापरतात की , त्यांना विविध प्रकारची कामे असतात. जसे बँकीग, पुस्तक वाचन, व ईतर महत्वाची कामे असतात म्हणून ते तशा प्रकारचा मोबाईल वापरतात. तुला मोबाईल वर जास्त वेळ घालवण्याची वाईट संवय लागू नये असे मला वाटते, म्हणून मी तुला हा एक साधा मोबाईल भेट देत आहे. यातच समाधान मानून तुझे जीवन, खूप अभ्यास करून चांगले घालव म्हणजे तुझा अभिमान तुझ्या आई-वडिलांना वाटेल, असे बोलून व एक साधा मोबाईल त्या बालकास देवून देवी ,तलावात पूर्ववत अंतर्धान पावते.

बिचा-या त्या बालकास ही बाब पटली व तो मोठया आनंदाने, एक साधा मोबाईल घेवून त्याचे घरी परतला. त्याचे आई-वडिलास क्षणभर वाईट वाटले पण याचाही आनंद झाला की त्या देवीने आपल्या मुलास चांगलाच उपदेश केला.

लेखक प्रकाश राऊत अमरावती दि. 13.07.2022

..........................................................................

## 15.मुन्शींचा पेन- बालसाहित्यकथा- लोककथा

बालमित्रांनो, आज एक कथा मी अजून तुम्हाला ऐकवणार आहे.

ब्रिटीशांच्या काळामध्ये प्रत्येक तहसीलीत किंवा मोठया गावामध्ये एका मुन्शीची नेमणूक, खास शेतक-यांकडून शेतजमीनीचा कर वसूल करण्याकरीता करण्यात येत होती. मुन्शींचे काम होते जवळपासच्या गावातून कर गोळा करायचा व जमा झालेली रक्कम जिल्हाधिकारी कार्यालयात जमा करायची.

एक दिवस मुन्शीजी जवळच असलेल्या यादवी गावात गेले. तेथे 'रियाजी' नावाचा राजा राज्य करीत असे. त्याचे राज्यात सर्व यादव लोक राहायचे. त्यांचा धंदा गाई म्हशी पाळायचा होता. त्यांचे कडे मोठया मोठया काडया असत. राजा सर्व कर गोळा करायचा पण त्याला कराची रक्कम जिल्हाधिकारी कार्यालयात दयायची नव्हती. हा मुन्शी जेंव्हा त्या गावात गेला तेंव्हा तो राजा म्हणाला,' मी तुला कोणत्याही प्रकारचा कर देणार नाही. माझ्याजवळची ही एक मोठी काडी तू पहा. मी कर न देताही तुला माझ्याकडे पैसे मिळाल्याची पावती दयावी लागेल. जर तू पावती मला  दिली नाही तर मी तुला या काठीनेच बदडल्या शिवाय राहणार नाही'.

मुन्शी पेचात पडले. त्यांनी पावती दयायचे कबूल केले. मुन्शींना हे चांगलेच माहित होते की, हे यादव लोक अडाणी आहेत. यांना लिहिता वाचता येत नाही. म्हणून तो एका पावतीवर , 'पेन हा काठीपेक्षा श्रेष्ठ आहे' असे लिहितो व ती पावती त्या यादवी राजा रियाजीकडे देतो.

मुन्शी त्या राजाची तक्रार कलेक्टर ऑफीसमध्ये करतो की, हा रियाजी कराचे पैसे देण्यास तयार होत नाही. कलेक्टर सर्व पोलीसांना सूचना देतो की, त्या राजाला पकडून आणा. सर्व पोलीस यंत्रणा शस्त्रानिशी त्या गावात पोहोचते. राजाला, त्या सर्वांना पाहून अतिशय आश्चर्य वाटते. पण तो घाबरत नाही. राजा म्हणतो,' माझ्याजवळ मी पैसे दिल्याची पावती आहे. हा मुन्शी खोटा बोलत आहे'. पोलीस अधिकारी जेंव्हा  ती पावती वाचतो तर त्यावर लिहिलेले असते की,' 'पेन हा काठीपेक्षा श्रेष्ठ आहे'. पोलीस म्हणतात, 'अहो ही पैशाची पावती नाही. तुम्हाला जेलमध्ये जावेच लागेल. पोलीस त्या यादवी राजाला पकडून जेलमध्ये टाकतात'.

तेंव्हा मुन्शी राजाला म्हणतात,' बघितलं, पेन हा तुझ्या काठीपेक्षा कसा श्रेष्ठ आहे ते.

बालमित्रांनो या कथेतून तुम्ही काय बोध घेणार ते मला प्रतिक्रीया देवून कळवा.

लेखक प्रकाश राऊत अमरावती दि. 21.06.2022

*************************

**16.माणूस आणि वाघ- बालसाहित्यकथा- लोककथा**

बालमित्रांनो, आता तुम्हाला शाळेच्या सुट्टया लागलेल्या आहेत. तुमच्या शाळा सव्वीस जूनला सुरू होणार आहेत. तोपर्यंत तुम्ही काही मजेशीर वाचावे या हेतूने मी आज तुम्हास एक वेगळीच गोष्ट सांगणार आहे.

एका गावात एक चांभार व एक धोबी राहात असे. त्यांची एकमेकांशी खूप मैत्री होती. चांभार हा चपला जोडे शिवायचा धंदा करीत असे पण ते गाव लहान होते त्यामुळे त्याचा धंदा जास्त चालत नव्हता. याउलट धोब्याचा धंदा जो लोकांचे कपडे रोज धुवायला न्यायचा त्याचा धंदा जोरात चालत होता. एके दिवशी धोबी कपडे घेवून नदीच्या काठावर गेला. त्याने खूप कपडे त्याचे गध्याचे पाठीवर लादले होते. गधा बिचारा ते ओझे घेवून नदीपर्यंत तर गेला पण तेथे गेल्यावर तेथून त्याने पळ काढला. अशा त-हेने त्या धोब्याचा गधा हरवला.

ईकडे चांभार नाराज अवस्थेत जंगलाकडे फिरायला निघाला कारण त्याचा चपला जोडयाचा धंदा फारसा चालत नव्हता. जंगलाकडे जातांना या चर्मकाराला मध्येच रस्त्यात एक वाघ भेटला. हा मात्र अजिबात घाबरला नाही. उलट त्या वाघाला पाहून हसला व त्यास म्हणाला,'हे वाघोबा दादा, नमस्कार......वाघाला खूप आश्चर्य वाटले की, हा मला, मी जंगलाचा राजा असूनही घाबरला नाही उलट मला हा नमस्कार करतो. वाघाने सहजच मग त्या चांभाराला विचारले,'तू मला कां घाबरला नाहीस.... ?.....चांभार म्हणाला,'हे दादा, मला तुझी खूप दया येत आहे कारण तू सारखा जंगलात अनवाणी पायाने फिरत असतो आणि तूला खूप काटे रूतत असतील.'.. मी तुझ्यासाठी चारही पायासाठी चांगले जोडे तयार करून देतो पण त्याला संध्याकाळपर्यंत माझ्या घराच्या मागे लपून बसावे लागेल.

वाघ लपून बसायला तयार झाला. जोडे शिवायला संध्याकाळ झाली होती. ईतक्यात त्याचा मित्र धोबी ओरडत ओरडत चांभाराकडे आला आणि म्हणाला, ' हे मित्रा, आज मी गध्यावर खूप कपडे लादून नदीवर गेलो तेंव्हा माझ्या गध्याला राग आला की काय तो यार अचानकच नदीवरून पळून गेला. आता मी त्याला काठीने चांगलेच बदडतो. मी काठी सुध्दा माझ्या सोबत आणलेलीच आहे. हे ऐकूण चांभाराला वाटले की, हीच संधी आहे आता वाघाला बदडण्याची. चांभार म्हणाला,'तुझा गधा कदाचीत माझ्या घराच्या पाठीमागे लपला असेल तर तू शोधून घे. तेथे अंधार पडला होता म्हणून धोब्याला अंधारात कोण उभे आहे हे दिसले नाही. नेमके कोण आहे हे न पाहताच याने काठीने त्या वाघास, गधा समजून मारायला सुरूवात केली. खूप मार खाल्यानंतर तो वाघ तेथून पळून जंगलात गेला. हा मार अर्थातच वाघाला कसा आवडणार. वाघाला खूप राग आला.

तो जंगलात गेल्यावर वाघाने सर्व प्राण्यांची एक सभा घेतली. वाघ म्हणला, आज मी तुम्हा सर्वांना पूर्ण पोटभर जेवण देणार आहे पण त्यासाठी तुम्हा सर्वांना माझेसोबत एका गावात चलावं लागेल. वाघाचा हेतू असा होता की, त्या धोब्याचे तुकडे तुकडे करून या सर्व प्राण्यांना खावू घालावे. ठरल्याप्रमाणे सर्व प्राणी घेवून तो वाघ या चांभाराच्या घराजवळ आला. सर्व जंगली प्राणी एकत्र पाहून हा चांभारही घाबरला. चांभार म्हणाला, 'हे वाघोबा दादा हे काय तुम्ही सर्वांना घेवून ईकडे कसा आलात...त्यावर तो वाघ म्हणाला...'आज मला त्या तुझ्या मित्राला म्हणजे धोब्याला खायचेच आहे... तू सुध्दा मला जोडे शिवून देतो म्हणून फसविले होते.

चांभार म्हणाला,'काही हरकत नाही. मी त्या धोब्याला ईकडे बोलावून घेतो. पण मला सांग तुम्ही एवढी मंडळी आणि तो बिचारा एकटा मग तुमचे सर्वांचे पोट भरणार कसे. त्यापेक्षा असे करा..तुम्ही सर्व एका जवळच्या गावात जा. खूप अन्न धान्य गोळा करा. आम्ही ते पूर्ण धान्य घेवून खूप सारा स्वयंपाक करतो व तुम्ही सर्व पोटभर जेवण करू शकता. वाघाला ते पटले. जंगलातील सर्व प्राण्यांनी शेजारच्या खेडयातून खूप सारे अन्न जमा केले व या चांभाराकडे आणून दिले. स्वयंपाक तयार झाला. सगळया प्राण्यांना खूप भूक लागलेली होती त्यामुळे ते जेवायला गडबड करीत होते.

चांभार म्हणाला,'अशी गडबड करून चालणार नाही. सर्वांना सारखे अन्न मिळायला हवे की नाही. तर तुम्ही सर्व एका ओळीमध्ये उभे रहा. कोणी ही मध्ये घुसू नये याकरीता मी

तुमच्यावर देखरेखीसाठी त्या धोब्याला बोलावतो. धोबी चतूर होता. त्यास हे माहित होते की, त्याचेवर हल्ला होणार आहे म्हणून तो एक मोठी दोरी घेवून आला. चांभारच्या सुचनेप्रमाणे वाघासहीत सर्वांना त्या दोरीने करकचटून बांधण्यात आले. सर्वांना बांधल्यानंतर त्या सर्वांची रवानगी जंगल खात्याच्या अधिका-याकडे सुपूर्द केली. अशा रितीने त्या सर्व प्राण्यांची सुटका केली व स्वत:चाही जीव वाचवला.

बालमित्रांनो, या गोष्टीवरून हा बोध मिळतो की, संकटाचे वेळी आपले डोके शांत ठेवून काही पर्याय आपली बुध्दी वापरून शोधावा, हेच मला या बालकथेतून सांगायचे होते. कथा आवडली असल्यास जरूर प्रतिसाद दया व ईतरांनाही वाचण्यासाठी प्रेरीत करा. व ही कथा दुस-यांनाही ऐकवा.

## 17.माणूस आणि कावळा .... बालसाहित्य कथा

एक म्हातारा माणूस होता. त्याला मुलं बाळं नव्हते. त्याची बायको सुध्दा मरण पावली होती. तो त्याचे घरी एकटाच राहात असे. तो तसा खाऊन पिऊन सुखी होता. एक दिवस एक कावळा त्याचे घरावर रोज येवून काँव काँव करायचा. त्याला वाटले उगीच कोणीतरी पाहूणा आपल्या घरी येईल. म्हणून तो त्या कावळयास रोज हाकलायचा. पण कावळा काही जायचे नाव घेत नव्हता. असे वाटत होते, जणूकाही कावळयाला काही सांगायचे आहे.

मग एक दिवस म्हाता-याला त्या कावळयाची कीव आली. तो म्हणाला की, "तुला नेमकं काय हवं आहे?"

कावळा पुन्हा काँव काँव बोलला. कावळयाची भाषा याला समजली नाही म्हणून यास वाटले की कावळयाला कदाचीत खूप भूक लागत असेल. असे समजून त्या म्हाता-याने त्याला एक मोठा भाकरीचा तुकडा टाकला. तो भाकरीचा तुकडा पाहून, त्या कावळयाने तो न खाता,

तेथेच ठेवला व थोडया वेळाने सर्व मित्रांना बोलावून आणले. आणि काय आश्चर्य की तो भाकरीचा तुकडा सर्वांनी वाटून खाल्ला. हे तो म्हातारा रोज पाहत असे.

कावळयांना वाटले की, हा म्हातारा तसाही खूप वयोवृध्द आहे व तो लवकरच मरेल, तेंव्हा त्याचे हे भाकरीचे उपकार आपल्यावर ठेवणे योग्य नाही. म्हणून सर्व कावळे एका समुद्राच्या काठावर गेले आणि ब-याच शिंपल्यांमधून एक एक मोती घेवून ते सर्व कावळे म्हाता-याच्या घरी आले. सर्वांनी चोचीत आणलेले मोती त्या माणसाला दिले.

त्या म्हाता-याने ते सर्व मोती रोज गोळा केले आणि कालांतरानंतर एक मोत्याची माळ तयार केली. असे करत त्याने ब-याच मोत्याच्या माळा तयार केल्या. त्याला हया माळा ख-या मोत्याच्या असल्याने खूप लोभ सुटला. वास्तविक तो मरणासन्न अवस्थेत असून सुध्दा त्याला या माळांचे पैसे जमवायचा छंदच लागला होता. कावळयांना वाटले, जशी त्याने दिलेली भाकर आपण सर्व कावळे मिळून वाटून खाल्ली, तसे हा कावळा हे सर्व मोती सर्व लोकांना वाटून देईन, पण विपरीतच परीणाम त्या कावळयांना दिसून आला.

मग एक दिवस अचानक त्याचा मृत्यू झाला. सर्व गावकरी मंडळी जमली आणि त्याची अंत्यविधी करण्यात आला. अंत्यविधीमध्ये ब्राह्मणाने यथोचीत पूजा केली आणि पिंडाचा गोळा झाडाखाली ठेवला तसे सर्व कावळे तेथे जमा झाले. पण कोणीच त्या म्हाता-याच्या पिंडाला शिवत नव्हते. ब्राम्हणाला आश्चर्य वाटले की, हा रोज त्या कावळयांना भाकरीचा तुकडा टाकत असे तरी  असे कां घडत आहे. तेंव्हा सर्व कावळयांनी काँव काँव असा आरडाओरडा केला.

ब्राम्हणाने त्या कावळयांकडे पाहले व बोलला की, हे कावळयांनो, "तुम्ही त्या म्हाता-याच्या पिंडाला कां शिवत नाही?" तेंव्हा सर्व कावळे पुन्हा ओरडले. त्या कावळयांच्या ओरडण्याचा आशय कोणाला कळला नाही. पण जेंव्हा त्या म्हाता-याच्या घराची झडती घेतली तेंव्हा सर्वांना कळून चुकले की म्हाता-याकडे असणारे सर्व मोती हे कावळयांनीच आणले असावे. कारण ब्राम्हणाने ते कावळे रोज त्याचे घरावर येत असल्याचे पाहले होते.

बालमित्रांनो, या गोष्टीवरून काय बोध घ्याल की पशू, पक्षी, प्राणी हे खादय पदार्थ दिसले तरी सर्वांमिळून वाटून खातात, मात्र फक्त माणूस हा एकच प्राणी असा आहे की, त्याला जे काही ईश्वर कृपेने मिळतं ते तो मरेपर्यंत साठवूनच ठेवत असतो.

धन्यवाद!

********************

## 18.राक्षसीचा त्याग- बालसाहित्यकथा- लोककथा

"काही वाईट लोकांमध्येही चांगले गुण असू शकतात".—प्रकाश राऊत

एका राजाला सात राजपुत्र असतात. ते सर्व एके दिवशी हरीणाच्या शोधात जंगलात जातात. जाता जाता त्यांना हरीण दिसते. ते हरीणाच्या मागे मागे खूप दूर जंगलात निघून जातात, याची त्यांना कल्पनाही येत नाही. शेवटी त्यांचे लक्षात येते की, आपण सर्व राक्षसाच्या भागात प्रवेश केला आहे. तेथे त्यांना सात राक्षसी दिसतात. हे राजपूत्र अतिशय दिसायला सुंदर असतात. यांचेवर त्या सातही राक्षसी भाळतात. त्यांना असे वाटते की...'आपण या सर्व राजपुत्रांशी लग्न करू व आपले एकदाचे शारिरीक समाधान झाले की मग आपण यांना मारून खावून टाकू.

या सातही राजपुत्रांना ते कब्जात घेतात. त्यांना विवाह करण्याचा आग्रह करतात. राजपुत्र संकटात सापडले असल्याने, त्यांचेजवळ काहीच ईलाज नसतो. ते सर्व या सातही राक्षसींशी विवाहबध्द होतात. काही काळ गेल्यानंतर या सातही राक्षसींचे शारिरीक समाधान झाल्यानंतर त्यांचे मनात या पुत्रांना मारण्याचा विचार येतो. ते एका सभेत हा ठराव पास करतात. पण ही बाब जी राक्षसी सर्वात लहान असते तिला पटत नाही कारण तिचे त्या तरूण पुत्रावर खरे प्रेम जडते.

मारण्याच्या आदल्या रात्री  लहान राक्षसी नव-यासोबत झोपली असतांना खूप रडते. राजपुत्र तिला विचारतो की...'तू कां रडत आहेस?.....ती बोलते....'उदया मी विधवा होणार आहे....याचे कारण विचारले असता ती सांगते की, उदया तुम्हाला माझ्या सहाही बहिणी मारून टाकणार आहेत. त्यामुळे मी सांगते तसे तुम्ही उदया करा'.

उदया सकाळी आम्ही सर्व राक्षसी भक्ष शोधण्याकरीता बाहेर जाणार आहोत. मी मागील दरवाजा उघडा ठेवणार आहे. मागे सात घोडे बांधून ठेवलेले आहेत. ते तुम्ही सोडून घ्याल व तात्काळ तुमच्या राज्यात आले, त्या मार्गाने पळून जा.

ठरल्याप्रमाणे दुस-या दिवशी सकाळ झाल्यावर, सर्व राक्षसी भक्ष शोधणार्थ बाहेर पडतात. तेंव्हा पळण्याची हीच संधी आहे, असे समजून सर्व राजपुत्र मागील दारातून घोडयांना घेवून पळतात. काही दूर जंगलात गेल्यावर त्या सर्व सातही राक्षसींना हे राजपुत्र पळतांना दिसतात. त्या सर्व जोरात पळून त्या राजपुत्रांना पकडतात. घोडयांचा वेग जास्त असतो त्यामुळे घोडे सापडत नाही. पण खूप प्रयत्न केल्यानंतर मात्र त्या सर्व राक्षसींच्या हातात घोडयांचे शेपूट लागतात. घोडे पळत, राजपुत्र त्यावर बसलेले व सातही बहिणींनी घोडयाचे शेपूट धरलेले अशा प्रकारे ते पुढे पुढे जात असतात. रस्त्यात सर्वात लहान राक्षसी जी असते, तिला याबाबत अतिशय वाईट वाटते. ती सर्व सहा बहिणींना म्हणते...' हे बघा, आपण सर्व केवळ घोडयांचे शेपूट धरून चाललो आहे. ती परत मोठयाने ही बाब समजावून सांगत असते की,.... जर या राजपुत्रांनी तलवारीने घोडयाचे शेपूट कापले तर आपल्या हातात केवळ शेपूटच राहील. व हे सर्व आरामात पळून जावू शकतात. हे राजपुत्रांना समजावे असाच लहान राक्षसीचा हेतू असतो. हे ऐकूण ते सर्व राजपुत्र सर्व घोडयांचे शेपूट कापतात व पळून जातात.

राजपुत्रांची सुटका होते. पण ही सर्वात लहान असणारी राक्षसी मोठयाने बोलण्यामुळेच ही आयडिया राजपुत्रांना कळली असे सर्वानुमते ठरते. या कारणाने सहाही बहिणींना या सर्वात लहान बहिणीचा खूप राग येतो. या रागाचा परीणाम असा होतो तिचा जीव ते घेतात. अशा त-हेने या लहानग्या राक्षसीने स्वत:चा त्याग करून सर्व राजपुत्रांचे प्राण वाचविले असतात.

बालमित्रांनो, या कथेवरून असा बोध घ्यावा की , वाईट माणसामध्येही काही चांगली माणसे असू शकतात, जी वेळप्रसंगी स्वत:चा त्याग करतात, हेच मला तुम्हाला सांगायचे होते.

स्वैर कथन --प्रकाश राऊत अमरावती दि. 18.07.2022

**********************

19.रंगीत कुत्रा..........कथा बालसाहित्य

एक होता पांढरा कुत्रा. तो एकदा एका झाडाखाली झोपला होता. त्याला लगेच झोप लागली. थोडया वेळाने तो उठला आणि पाहतो तर त्याचे अंगावर जांभळया रंगाचे डाग त्याला दिसले.

त्याने वर पाहले तर पांढरे ढग वरून जात होते. त्याने पांढ-या ढगांना विचारले की..... "तुम्ही मला हे डाग दिले काय?"

ढग म्हणाले.... "आम्ही तर पांढरे आहोत आम्ही कसे काय हे डाग तुला देणार."

मग वर पहातांना त्याला सूर्य दिसला. तो सूर्यास विचारू लागला की तुम्ही मला हे डाग दिले काय. सूर्य म्हणाला..... "मी तर पिवळा आहे मी कसे देणार तुला असे डाग."

मग वर त्या कुत्र्याला कावळा दिसला. त्याने कावळयाला पण विचारले की............. "तू मला हे डाग दिले काय." तो म्हणाला...... "मी तर काळा आहे. मी कसा देणार तूला असा डाग."

मग रस्त्याने त्याला फुगे दिसतात. तो फुग्यांना विचारतो तुम्ही दिले काय हे जांभळे डाग मला. ते म्हणाले..... "आम्ही तर फक्त लाल आहोत. आम्ही कसे देणार हे डाग."

मग तो खूप विचार करतो व त्याच झाडाखाली झोपी जातो. थोडयावेळाने पाहतो तर त्यास "टपssटपss असा आवाज येतो. तेंव्हा त्याच्या लक्षात येते की, आपण या जांभळाच्या झाडाखाली झोपलो होतो म्हणूनच आपल्या अंगावर हे जांभळे डाग पडलेत.

धन्यवाद बालमित्रांनो, आपण ही गोष्ट आपल्या आईवडिलांना सांगा व फावल्या वेळात worldreader.org वर अशा छान छान गोष्टी वाचत चला. त्यावर तुम्हाला हिंदी व ईंग्रजीत खूप गोष्टी वाचायला मिळतील.

*******************

**20.राजपुत्र- बालसाहित्यकथा- जादूच्या गोष्टी**

बालमित्रांनो, आज आणखी एक कथा खास तुमच्या सुट्टया मजेत घालविण्यासाठी.

एक राजपुत्र असतो. तो त्याचेकडे असणा-या ऐश्वर्याला फार कंटाळला असतो. तो एक दिवस घराबाहेर पडतो. बाहेर पडल्यावर त्यास खूप भूक लागते.

रस्त्यात एक बाई आंबे विकत असते. तो आंबे विकत मागतो. ती विक्रेती त्यास आंबे विकत दयायला नकार देते. ती म्हणते,'हे आंबे जादूचे आहेत. ते मी तुला फुकटच देतो. ती मग त्या मुलाला 'तीन आंबे' मोफतच देते. मात्र एक सूचना देते की, हे तीनही आंबे जादूचे आहेत त्यामुळे तूला जर खायचे असले तर, तू पाण्याजवळ जावून आंब्यांना सोलून खाशील.

तो तीन आंबे घेवून रस्त्याने जात असता त्याला मध्येच भूक लागते. तो मग पाणी न शोधताच तीन आंब्यापैकी एका आंब्याला सोलतो. ते जादूच असल्यामुळे व पाण्याजवळ न सोलल्यामुळे, त्यातून एक मुलगी बाहेर पडते. त्याला ती मुलगी खूप आवडते पण जसा हा आंबा खाण्यास सुरूवात करतो तशी ती मुलगी गायब होते. त्यास दु:ख होते पण नाईलाज असतो.

काही दूर गेल्यानंतर, परत तो दुसरा आंबा सोलतो पण तेथेही जवळपास कोठेही पाणी नसते. आता त्या दुस-या आंब्यातून अजून एक बाई निघते. ही बाई मात्र भूतणी असते. ती त्याला आंबा खाऊच देत नाही. तो नाईलाजास्तव तिसरा आंबा सोलतो. आता मात्र त्यातून अजून एक अतिशय सुंदर मुलगी निघते. त्याची ईच्छा तिच्याशी लग्न करण्याची होते म्हणून तो त्या दुस-या आंब्यातून निघालेल्या भूतणीला म्हणतो,' हे भूतणी, तू मला दुसरा आंबाही खावू दिला नाही तर मग आता मला हा तिसराही आंबा खायचा नाही पण तू मला या तिस-या आंब्यातून निघालेल्या मुलीशी विवाह करण्याची परवानगी दे'. तू तर काहीही करू शकते.

ती भूतणी खूप खूष होते व त्या राजपुत्राला त्या सुंदर मुलीशी लग्न करण्याची परवानगी देते. अशा त-हेने त्या राजपुत्राचा संसार सुखाचा  होतो व ते दोघेही पुढील जीवन अत्यंत आनंदाने घालवतात.

झाली माझी गोष्ट. मुलांनो आपल्याला आवडली असल्यास, कमेंट बॉक्समध्ये मला जरून प्रतिक्रीया दया, तरच मी छान छान गोष्टी यापुढेही तुम्हास सांगेनच.

लेखन व शब्दांकन:- प्रकाश राऊत अमरावती दि. 17.06.2022

(Ref:- स्पॅनिश कथेच्या आधारे And my daily vast reading.)

## 21.लहरी राजा – लोक कथा- बालसाहित्य

कोणे ऐके काळी एक राजा होवून गेला. तो स्वभावाने फारच लहरी होता. त्याची नगरी ही अंधेर नगरीच होती. त्याने राज्यात एकदा असे ठरविले की, प्रत्येक वस्तू ही केवळ एकच रूपयाला विकायची. मग ते कोणतीही भाजी असो वा गंगाफळ असो की, कोणतेही फळ असो. अशाप्रकारे त्या राज्यात कोणतीही गोष्ट केवळ एकच रूपयाला मिळत असे.

असे करीत असतांना, कचेरीतील कर वसूल करणारा माणूस, एका गंगाफळ विकणा-याजवळ आला. त्यास करापोटी पैसे मागू लागला पण हयाचेकडे कोणत्याही फळाची विक्री न झाल्यामुळे तो कर देण्यास नकार देवू लागला. तेंव्हा त्या करवसूलीवाल्याने सात फळाची मागणी केली. त्या गरीब माणसाकडे केवळ सहाच फळे होती. शेवटी ती सहाही फळे करवाल्याने घेतली. या गरीब माणसावर अन्याय झाला. तो लहरी राज्याकडे गेला पण त्यास न्याय मिळाला नाही उलट राजा बोलला की, तू पुरेशी फळे आणायला पाहिजे होती. शेवटी त्या गरीब माणसाला फासावर चढवायचे ठरविण्यात आले. ईतक्यात एक साधू तेथे आला व बोलला की, एवढया लहानशा बाबीसाठी याला फाशी देणे योग्य होणार नाही.

तुमच्या राज्यात यापेक्षाही मोठी घटना घडली आहे. राजा म्हणाला.... 'असे काय माझ्या राज्यात घडले आहे ते मला सांगा'. साधू बोलला...'अहो महाराज, तिकडे एक चोर एका घरात चोरी करीत असतांना ते घर त्याचे अंगावर पडले व तो मरण पावला आहे. तेंव्हा त्या घरमालकाला तुम्ही फाशी दयायला पाहिजे'.

'बोलवा त्या घरमालकाला येथे ...राजा बोलला.

घरमालक राजासमोर हजर झाला. तो म्हणाला... 'महाराज माझे काय चुकले....उलट त्या चोराने माझे घरातून चोरी करून काही सामान चोरले असते, पण देवाने त्याला मारून चांगलीच अद्दल घडविली आहे'.

राजा बोलला....'तू तुझे घर कच्चे कां बांधले. ते जर पक्के बांधले असते तर अशी घटना घडलीच नसती व तो चोर मेला नसता'.

'महाराज यात माझी काहीच चूक नाही. ते घर एका गवंडयाने बांधलेले आहे वाटल्यास तुम्ही त्याला फासावर चढवू शकता.

'बोलवा त्या गवंडयाला'....राजा बोलला.

राजाने त्या गवंडयास गावातून बोलावले. गवंडी जेंव्हा राजासमोर उभा झाला तेंव्हा म्हणाला... महाराज, 'मला माफ करावे कारण यात माझी काहीच चूक नाही. मी समोरून जाणा-या त्या बाईकडे पहात बांधकाम केले कारण ती अतिशय सुंदर होती. या कच्च्या बांधकामाला तीच जबाबदार आहे. मी तिच्याकडे पाहले नसते तर बांधकाम छान झाले असते.

'बोलवा त्या बाईला'......राजा बोलला.

ती बाई या लहरी राजासमोर उभी झाली व क्षमायाचना करू लागली... 'महाराज यात माझा काय गुन्हा आहे बरं, मी तर समोर माझ्या प्रियकराकडे चालली होती. यात त्या प्रियकराचाच दोष आहे. तुम्ही त्यास फाशी दया'.

राजा त्या सुंदर बाईच्या प्रियकराला बोलावतो व फाशी दयायचे ठरवितो. जल्लादला बोलावण्यात येते व फाशीची तयारी झाली असते पण जल्लाद म्हणतो की, महाराज ज्याला फाशी दयायची आहे त्याची मान ईतकी बारीक आहे की, तो दोरी आवळली तरी मरणारच नाही.

मग राजा बोलतो की, 'शोधा असा माणूस की जो फाशीच्या दोरीने मरेल'. जल्लाद त्या राज्यात अशा जाडया मानेच्या माणसाला शोधायला जातो. तेथे त्यास असा माणूस म्हणजे तो गावातील साधूलाच पकडतो. साधू त्या गावात, कोणतीही वस्तू एकाच रूपयात मिळते, या लोभाने राहात असतो. पण त्याचा शिष्य मात्र गावाबाहेर पळून गेलेला असतो कारण केवळ या राजाचा लहरीपणा पाहून. हा राजा कधी काय करेल याचा नेम नाही हे त्या शिष्याने ताडले होते.

राजा त्या साधूला फाशीवर चढविण्याची पूर्ण तयारी करतो व त्यास अंतिम ईच्छा विचारतो. तो म्हणतो की, ‘माझ्या शिष्यासमोर मला फाशी देण्यात यावी हीच माझी अंतिम ईच्छा आहे’. राजा त्या शिष्याला बोलावून घेतो. शिष्य तेथे आल्यावर राजाला म्हणतो की, ‘मला अगोदर फाशी दयावी पण माझ्या गुरूला फाशी देवू नये’. पण साधू ऐकत नाही तो ही हाच आग्रह धरतो की, मला शिक्षा दिली आहे तर मलाच अगोदर फाशी झाली पाहिजे. ‘मला आधी, मला आधी’ असे दोघांमध्ये भांडण होते. राजा म्हणतो आरे मुर्खांनो, माणसं जीवन जगण्यासाठी तडफडतात आाणि तुम्ही दोघे मरणासाठी भांडत आहात. हा काय मुर्खपणा आहे. तेंव्हा शिष्य म्हणतो ..’महाराज,आजचा दिवस ईतका शुभ आहे की, जो या दिवशी मरेल तो पुढच्या जन्मात पृथ्वी, चंद्र व आकाश या तिन्हीचा ही राजा होणार आहे. हे एकूण राजाला मोह सुटतो. तो जल्लादला बोलतो की, ‘असे असेल तर मलाच तिन्ही ठिकाणचा राजा व्हायचे आहे, त्यामुळे मलाच या दोघाअगोदर फाशी देण्यात यावी. अशा त-हेने त्या राजास फाशी दिल्या जाते.

सांगण्याचे तात्पर्य असे की, कोणत्याही माणसाने कशाचाही लोभ जीवनात करू नये. हेच मला या कथेतून सांगायचे होते.

........................................................................................................

शब्दांकन प्रकाश राऊत दि. 28.07.2022

***************

**22.विचित्र भावंड- बालसाहित्यकथा-फँटसी-**

जादूच्या गोष्टी- विदेशी कथा

बालमित्रांनो, या सर्व जगातील प्रसिध्द अशा विदेशातील कथा आहेत. ज्या तुम्हा मुलांना केवळ मनोरंजन व्हावे, या हेतूने मराठीतून मी माझ्या भाषेत कथन करण्याचा प्रयत्न करीत आहे. याचे कोणतेही शब्द जसेच्या तसे भाषांतरीत केलेले नाही तर हे स्वैर अनुवादीत असून त्यात माझ्या कल्पनेची जोड दिलेली आहे, याची नोंद घ्यावी व केवळ आंनद घ्यावा.

एका म्हातारीला पांच मुले होती. पांचही मुले दिसायला सारखीच होती पण प्रत्येकाचे वैशिष्ठय वेगळेच होते. पहिला मुलगा हा समुद्रातील पूर्ण पाणी तोंडात साठवू शकेन एवढी त्याची क्षमता होती. दुस-याची मान स्टील तलवारीने पण कापता येणार नाही असे त्याचे शरीर होते. तिसरा हा असा होता की, त्याला स्वत:चे पाय कितीही लांब करता येत होते. चवथा असा होता की, त्याला अग्नीही जाळू शकत नव्हती. पांचवा मुलगा तर असा होता की, त्याला श्वास न घेताही जिवंत राहाता येत होते. असे सर्व भावंड विचित्र असून सुध्दा शेजा-यांना यांच्या गुणांची भनकही लागली नव्हती.

पहिला मुलगा हा नेहमी समुद्रावर जायचा. पूर्ण पाणी तोंडात गिळायचा व तेथील मासे घरी आणायचा. शेजारच्यांना एक दिवस याबाबत आश्चर्य वाटले की, ही मासे पकडण्याची कला आपल्याही मुलांना याचेकडून शिकवायला सांगावे. शेजारी त्याचेकडे गेले व बोलले की,' हे दादा, ही मासे पकडण्याची कला आमच्याही मुलांना शिकव.'

तो मुलगा तयार झाला. कला शिकण्याचे व मासे पकडण्याचे हेतूने या म्हातारीच्या पहिल्या मुलासोबत शेजा-याचा मुलगा समुद्रावर गेला. तेथे गेल्यावर म्हातारीच्या मुलाने लगेच समुद्राचे पूर्ण पाणी तोंडात शोषून घेतले व तोंड फुगवून काही वेळ तसाच राहला. सर्व मासे एकाच जागी जमा झाले व तडफडायला लागले. ते मासे शेजारचा मुलगा गोळा करणार ईतक्यात ज्याने हे पाणी तोंडात साठवून ठेवले होते त्याची साठवण्याची क्षमता संपली व त्याने तोंडातील पूर्ण पाणी बाहेर सोडले. या पूर्ण पाण्याने समुद्र जसा होता तसाच भरला व शेजारचा मुलगा त्या पाण्यात बुडून मरण पावला.

ज्या शेजा-याचा हा मुलगा होता त्याने न्यायालयात तक्रार केली की, म्हातारीच्या पहिल्या मुलाने त्याचे मुलाचा बळी घेतला. खरोखरच हा त्या मुलाचा गुन्हा नव्हता कारण त्याने काही शेजारच्या मुलाला बोलावलेले नव्हते. तरीपण म्हातारीच्या मुलाला मृत्युदंडाची शिक्षा न्यायालयाने ठोठावली. व सांगितले की, या अशा गुन्हेगाराची मान तलवारीने उडवावी.

शिक्षा झालेला मुलगा म्हणाला..' काही हरकत नाही पण मला प्रथम माझ्या आईला भेटू दयावे अशी माझी अंतिम ईच्छा आहे'......न्यायालयाने तशी परवानगी दिली... मुलगा घरी आला व त्याची व्यथा आईला सांगू लागला. आई बोलली,' काही हरकत नाही, तू आणि तुझा दुसरा भाऊ हे सारखेच आहेत तेंव्हा तुझ्या जागेवर या तुझ्या दुस-या भावाला मी पाठवतो'.....

ठरल्याप्रमाणे दुसरा मुलगा शिक्षेसाठी तयार झाला. त्याची मान एका लाकडी ठोकळयावर बांधण्यात आली व त्याचेवर तलवारीचे घाव करण्यात आले पण काही केल्या त्याची मान त्या तलवारीने कापली जात नव्हती कारण तो स्टीलचे घाव सहन करू शकेन, अशी त्याची शरीराची क्षमता होती. जल्लाद फार त्रासला व न्यायालयात गेला व बोलला की,,, 'याची मान तलवारीने कापल्या जात नाही'. तेंव्हा न्यायालयाने दुसरा आदेश दिला की, 'याला पाण्यात बुडवून मारावे.' दुसरा मुलगा परत तेच म्हणाला की, मला पाण्यात बुडविण्याची शिक्षा करण्यापूर्वी मला माझ्या आईला भेटू दयावे. भेटण्याची परवानगी मान्य करण्यात आली.

म्हातारीचा हा दुसरा मुलगा घरी आला व त्याची व्यथा आईला सांगू लागला. आई बोलली.. 'काही हरकत नाही, तुझ्यासारखाच तुझा तिसरा भाऊ दिसतो, मी त्याला तुझ्या जागेवर पाठवतो. आता तिसरा मुलगा न्यायालयासमोर गेला व त्याला समुद्राच्या सखोल पाण्यात बुडविण्याची तयारी करण्यात आली. प्रथम त्याला, साधारण पाण्यातच हा बुडेल असे गृहीत धरून बुडविण्याचा प्रयत्न करण्यात आला. तो यासाठी सफल झाला नाही की, जसे त्यास पाण्यात टाकले तसे तो पाय पाहिजे तसे लांब करू शकत होता व त्याचे मुंडके बाहेरच राहायचे. मग त्यास समुद्राच्या मध्यभागात नेण्यात आले तेथेही तो कसा बुडणार कारण तेच की, तो त्याचे पाय समुद्राच्या खोलीपर्यंत लांब करू शकत होता. त्यालाही परत जिवानीशी मारणे कठीण गेले व न्यायालयात परत आणण्यात आले.

आता मात्र न्यायाधीश फारच त्रस्त झाला व म्हणाले की आता याला अग्नी देवून पूर्णपणे जाळण्यात यावे. पुन्हा तीच विनंती करण्यात आली की, मरण्यापूर्वी आईला भेटू दयावे. न्यायाधीशाने मान्यता दिली. आईने चवथ्या मुलाला पाठवले पण तो अग्नीतही जळू शकला नाही. असे करत शेवटी पांचव्याला गाडण्याचा निर्णय घेण्यात आला. पांचव्या मुलाला श्वास विरहीत जीवन जगण्याची कला अवगत होती त्यामुळे त्याला न्यायालयाने गाडण्याचा प्रयत्न करूनही तो जिवंत राहला. अशा त-हेने या म्हातारीची पांचही मुले जगली व यापुढे आनंदात राहू लागली.

बालमित्रांनो, जीवनात खूप आनंद मिळविला पाहिजे मग तो कथेच्या माध्यामातून कां असेना...करीता मी माझ्या अवाढव्य वाचनातून तुमचे मनोरंजन करण्याचा प्रयास घेत असतो.

धन्यवाद!

संकलन व शब्दांकन:-प्रकाश राऊत अमरावती दि. 24.08.2022

Ref:-My vast reading. I used to retold the stories with my imaginations added in it.

---

**23.मांजरीचे नांव- बालसाहित्यकथा**

फार फार पूर्वी चीन देशात एक राजा राहात होता. त्याला कोण्या एका ईसमाने ‘मांजर’ भेट दिली. राजाला प्रश्न पडला की, या मांजरीचे नाव काय ठेवावे. त्याने एक महासभा भरविली व सर्वांना सांगितले की जो कोणी या मांजरीचे योग्य नांव सुचवेल तेच नांव मी या मांजरीचे ठरविणार आहे. तसेच त्यास योग्य बक्षीस पण देवू करणार आहे.

सर्व मंडळी विचार करू लागली व जो तो आपल्या मनातील विचार व ठरविलेले नांव सुचवू लागला. प्रथम ईसम म्हणाला,’महाराज या मांजरीचे नांव ‘टायगर’ असे ठेवा’. दुस-याने त्यावर आक्षेप घेतला व बोलला की, टायगर काही आकाशात डरकाळी फोडू शकणार नाही, त्यापेक्षा या मांजरीचे नांव ‘डायनोझर’ ठेवा. हा प्राणी खूप मोठा आवाज करू शकेल.

तिसरा ईसम बोलला,’ आकाशाचाच विचार करायचा असेल तर मग ‘वारा’ हे नांव ठेवायला काय हरकत आहे. वारा सगळीकडे उडू शकतो. हेच नांव या मांजरीला योग्य वाटते.

चवथ्या ईसमाला हे नांव सुध्दा पटले नाही. तो म्हणाला, ‘वा-याला तर साधी एक भिंत अडवू शकते मग ‘भिंत’ हे नाव चांगले वाटेल’. पांचवा ईसम बोलला,’भिंत, हे काय मांजरीला शोभणारे नांव वाटते काय. भिंतीला तर साधा उंदीरही पोखरून आरपार करू शकतो. म्हणून आपण या मांजरीचे नांव ‘रॅट’ ठेवणेच छान वाटेल.

राजाला हे नांव बरे वाटले पण त्यातही एकाने आडकाठी आणली. महाराज ‘रॅट’ हे नांव जरी सुटसुटीत वाटत असले तरी अशा रॅटला तर ‘रॅट’ ऐवजी ‘कॅट’ म्हणणे योग्य वाटेल. आता मात्र राजाला संताप आला. राजा बोलला...आता मला तुम्ही काहीही सुचवू नका. मी हे कॅट (Cat) नांवच अंतीम ठरवितो.

अशा प्रकारे मुलांनो या मांजरीला चीन देशात ‘कॅट’ म्हणणे रूढ झाले. आपला देश मात्र संस्कृत भाषेला जास्त मान देत आला आहे म्हणून आपण संस्कृतमध्ये ‘मार्जर’ म्हणजेच मांजर असे मराठीत म्हणू लागलो आहे.

शब्दांकन व कल्पना विस्तार लेखक प्रकाश राऊत,अमरावती दि. 23.08.2022

****************************

## 24.साधू आणि पोपट- बालसाहित्यकथा

एकदा एका जंगलात एक साधू फिरत होता. त्याला असे आढळले की, काही पोपट एका झाडाखाली जाळयामध्ये अटकलेले आहेत. त्याला प्रश्न पडला की, हे असे जाळयात कसे काय अडकले असावेत. त्या साधूने पक्षाच्या बोलीत त्यांना विचारले की, आपण सर्व पोपट या जाळयामध्ये कसे काय अटकले. तेंव्हा त्यातील वयोवृध्द पोपट म्हणाला…’आम्ही झाडावरच बसलो होतो, पण काही दाणे आम्हास झाडाखाली दिसले, ते खाण्यासाठी आम्ही सर्व झाडाखाली गेलो. आम्ही सर्व एकत्रच दाणे खाण्यात गुंग असतांनाच एका शिका-याने आमच्यावर जाळे टाकले आणि आम्ही अशा त-हेने येथे अटकलो आहे.

साधुने क्षणभर विचार केला. साधू म्हणाला….’काही हरकत नाही. मी तुम्हास आता या जाळयातून सोडवतो आणि एक मंत्र देतो, तो तुम्ही समजून पाठ करावा व तो मंत्र सतत म्हणत राहावे. मंत्र असा आहे…..’शिकारी आयेगा, दाना डालेगा, जाल बिछायेगा, फसना नही’. सर्व पोपट तो मंत्र अगदी जशाचे तसाच पाठ करतात व दररोज सतत म्हणत असतात.

कालांतराने शिकारी जेंव्हा हे ऐकतो तेंव्हा त्यास नवल वाटते की, हे असे यांना कोणी शिकविले. तरीपण तो विचार करतो की, आपण आपली नित्याची क्रिया सोडू नये. तो झाडाखाली आपले जाळे पसरवतो व त्यावर काही दाणे टाकतो. सर्व पोपट मात्र त्या झाडावर हा मंत्र एकसारखे म्हणतच असतात. त्यांचे हे सुध्दा लक्षात येत नाही की, शिकारी कधी आला व कधी झाडाखाली जाळे टाकून गेला. क्षणार्धात ते त्या जाळयामध्ये पुर्वीसारखेच अटकतात.

साधू परत एके दिवशी त्याच रस्त्याने जात असतांना, त्याला परत पोपट अटकलेले दिसतात. त्याला परत नवल वाटते की, मंत्र देवूनही हे पोपट या जाळयामध्ये कसे काय

अटकलेत. तो साधू त्या पोपटांना विचारतो की, ‘आपण मंत्र केवळ पाठ केला आहे. त्या मंत्राचा अर्थ आपण  समजून घेतला नाही. जेंव्हा तुम्ही शिकारी आयेगा असे म्हणता तेंव्हाच त्या शिका-याकडे लक्ष दयायला पाहिजे होते’. पण असो ,आता तुमची ही पाठ करण्याची संवय जावी व तुम्हाला हे चांगलेच लक्षात राहावे म्हणून मी आता तुम्हास सोडवत नाही.

सर्व पोपट झालेल्या चुकीबाबत खूपच नाराज असतात पण यावर काही ईलाज नसतो. त्या सर्व पोपटांना घेवून शिकारी घरी जाणार, ईतक्यात एक वनविभागाचा अधिकारी त्या शिका-याजवळ येतो. तो वन अधिकारी या सर्व पोपटांची सुटका करतो व जंगलात विहार करण्यासाठी सोडून देतो. बालमित्रांनो, त्या साधूच्या काळामध्ये फक्त मंत्र मिळत होते पण आजकाल वन्यप्राण्यांना पण संरक्षण मिळावे याकरीता सरकारने कायदे केलेले आहेत. आपण आपल्या घराजवळ या प्राण्यांसाठी उन्हाळयामध्ये पाणी पिण्याची व्यवस्था केली पाहिजे. त्यांना खायला दाणे दिले पाहिजे. आपण जसे जगतो तसेच त्यांनाही या जगात जगण्याचा अधिकार आपण प्राप्त करून दिला पाहिजे, हेच मला या पुरातन गोष्टी तुम्हाला सांगून काहीतरी नवीन असे सुचवायचे होते.

धन्यवाद बालमित्रांनो......वाचत चला बरं! खूप अवांतर वाचन केल्याने आपणही मोठे झाल्यावर असेच काहीतरी लिहाल याची मला खात्री आहे.

लेखक प्रकाश राऊत अमरावती दि. 28.07.2022

**************************

## 25.आगळा अनुभव- विनोदी मर्मकथा

अगोदर खूप गरीबी भोगली. खूप अभ्यास केला. नोकरी लागली आणि कनिष्ठ अभियंता झालो. मग काय मनातले मनसुबे उभे झाले. ईच्छा काही पूर्ण होईना. ईच्छा कोणती तर, मोटरसायकल घ्यायची. त्या काळात लक्ष्मी फोर्टी एट घेण्याएवढीच ऐपत होती कारण ती केवळ रूपये बत्तीसशेमध्ये मिळत होती. मोठे बंधू स्वर्गीय श्री. किशोर हे त्यांचे मित्राची ‘व्हीक्की मोटरसायकल’ जी दोनच गेअरची होती, ती चालवून समाधान मानत होते. तशात मी त्यांना वरील कथीत ‘लक्ष्मी फोर्टी एट’ घेण्याची ईच्छा मांडली. त्यांना माझा अभिमान वाटला की, आपला लहान भाऊ टू व्हीलर घेणार. त्यांनी त्या काळात मला अडतीसशे रूपयाची मदत केली.

मग गाडीचे बजेट वाढले. आता 'विजय स्कूटर' घेण्याएवढे पैसे जमले होते. ईतक्यात माझे वडील जे प्राथमिक शिक्षक होते, त्यांनीही हिंमत दाखवली व मला सव्वीसशे रूपयाची मदत केली. अशा त-हेने माझ्या जीवनात पहिली 'राजदूत मोटरसायकल'MXF 4602 उभी झाली. ती 1980ला.

आता ईच्छा वाढत गेल्या. मला वाटले कार शिकावे. माझ्याकडे साईटवर जाण्यासाठी शासनाने एक बोढकी जीप दिली होती. त्यावर मोतीराम ड्रायव्हर होता. तो डेली वेजेसवर माझेकडे कामावर होता. तो माझे ऐकत असे. त्याला केवळ दररोज पांच रूपयाची मदत मी करीत असे. व त्याचेकडील जीपचे स्टेअरींग हातात घेवून मी जीप चालवायला शिकलो. आता मात्र कार घेण्याचे स्वप्न मी पहात होतो. वर्ष होते 1980. पण कार घेण्याएवढी ऐपत नव्हती. मग काय 'आर.जे. शाह कंपनी'च्या जीप मला धोपटायला मिळायच्या. मी ड्रायव्हींगचा खूप अनुभव घेतला, तसा तसा कार घेण्याची ईच्छा बळावत गेली. 1980 ते 1997 असा सतरा वर्षांचा काळ लोटला पण मी कार घेवू शकलो नाही. शासनाने माझ्या बदल्या विविध ठिकाणी केल्या. मी तोतलाडोह प्रकल्पावरून अकोला व मग अमरावतीला आलो होतो. त्यावेळी माझा लहान मुलगा आशय हा चवथ्या ईय्यतेत गेला होता.

आमचे दोघांचे एकच काम. रोज जवळपासच्या कॉलनीत फिरायला जायचे व लोकांच्या आंगणात ठेवलेल्या कार पहायचे. हा जुनी कार विकेल काय, तो विकेल काय असे विचार करीत असतांना एक पांढ-या रंगाची फियाट कार, आम्हास पसंद पडली. आता 'ईच्छा तेथे मार्ग' असे म्हणतात. आम्ही थेट त्यांचे घरात घुसलो व मोठया हिंमतीने त्यांना विचारले ......'सर, आपण ही कार विकता कां? त्यावेळी स्वारी घरात वेगळयाच मूडमध्ये होती. कदाचीत ती मदयधुंदीत असावी, असा आमचा प्राथमिक अनुभव होता. त्यांनी लगेच होकार दिला. गाडीची किंमत ठरली. पंचेचाळीस हजार रूपये. कार सेकंड हँड होती पण कंडीशन चांगली होती. आमचीच कंडीशन कारपुढे फिक्की पडली होती.

'पप्पा, ही कार घ्यायचीच.....मुलाचा आग्रह होता'...मला कार चांगल्या रितीने चालवता येत होती त्यामुळे कार घ्यायचे ठरले. जवळ केवळ तीस हजार रूपयेच होते. ईकडून तिकडून पैसे जमविले आाणि माझे जीवनात पहिली फियाट कार आली. सन 1997 ते 2005 पर्यंत कारचा खूप आनंद घेतला. जुनी कार होती अर्थात 'घडाईपेक्षा मढाई जास्त'हा अनुभव घेतला. कार

घेतल्यावर ही खूप चांगले विनोदी अनुभव प्रवासत आलेत. पहिला अनुभव म्हणजे कारमध्ये पेट्रोल भरतांना कार ड्रायव्हींग सीटवरून उतरून पेट्रोल काटयाकडे पाहू नये, असे मित्र म्हणाला कारण असे केल्यास पेट्रोल भरणा-याला वाटते की हा ड्रायव्हर आहे. मी पुढे सुधारणा केली व सीटवर बसूनच पेट्रोल भरू लागलो.

मी आणि माझी बायको नेहमी माझे मुलांबाळासोबत फिरायचो. एकदा काय झाले की, गाडी अमरावती आर्वी रोडवरील कौंडण्यपूर येथे एका टपरीजवळ थांबवली. शिष्टाचार पाळावा म्हणून गाडीमध्येच 'टपरीवरचे भजे बोलवायचे' मी ठरविले. पण गाडीतून माझी बायको लगेच त्या टपरीवाल्याला म्हणाली की....'भजे काय प्लेट आहे?....मी फार खजील झालो. मी तिला म्हणालो.... 'अगं असं विचारू नये...कारण तो एक टपरीवाला आहे. हे त्याचे काय फाईव्ह स्टार हॉटेल आहे की तो जास्त चार्ज लावणार आहे'. आपण कारवाले ....'घेवून घेवन तो काय घेणार आहे'...यावर माझी बायको हसायला लागली व म्हणाली....तुमचंही बरोबरच आहे.. असे आपले सामान्याचे जीवन बरेचदा काही गंमती शिकवून जातात. अर्थात हे सांगण्याची हिंमतही असावी लागते. असे वक्तव्य फक्त लेखकच लिहू शकतात.

हा आगळा अनुभव मला आजही आठवला की, खूप हसायला येते. आणि आज माझी परिस्थिती अशी आहे की, मी दहा लाखाच्या गाडीत फिरतो आहे आणि हाच माझा मुलगा आशय हा अमेरिकेत छत्तीस लाखाच्या गाडीत फिरत आहे. सांगण्याचे तात्पर्य एवढेच की, माणूस कितीही मोठा झाला, तरी त्यास आपले 'गरीबीचे दिवस' आठवायला पाहिजे. एवढेच काय ते मला या जीवनकथेतून आपणास सांगायचे होते.

************************

## 26.हत्ती आणि किडे- बिहारी लोककथा- बालसाहित्यकथा

कोणे एके काळी शरयू नदीजवळ एक कोळी राहात असे. तो नेहमी उदरनिर्वाहासाठी, शरयू नदीतून मोठे जाळे टाकून, खूप मासे जाळयामध्ये अडकवायचा व घरी आणून सर्व मंडळी त्यावर ताव मारत असे. या कृत्यामुळे त्याचे घरची सर्व मंडळी आनंदात होती. मासे मरण पावल्यामुळे त्यांना किडयांचा जन्म मिळाला. ईकडे कालांतराने या कोळयाचाही मृत्यू होतो व

त्यास हत्तीचा जन्म मिळतो. सर्व प्राण्यांना जसे की, वाघ सिंह ईत्यादींना शिकार करून खायला मिळत असे पण हत्तीला असे काही करता येत नव्हते. त्याला खायला अन्न न मिळाल्यामुळे तो आपली भूक पाण्यावरच भागवत असे.

उन्हाळ्याच्या दिवसात त्यास पाणीही मिळेनासे झाले. मग तो हत्ती पाण्याचे शोधात एका खडकाजवळ जातो. त्याला आढळते की, खडकांच्या फटीतून एक झरा वाहतांना दिसतो. त्याची सोंड त्या फटीत जाईन एवढी ती फट असते. तो तहानलेला असल्याने त्या फटीत आपली सोंड खूपसतो व खूप पाणी पितो. पण काय होते की, सोंड बाहेर काढतांना ती सोंड त्या फटीत अटकते व त्याचे मानेजवळ जखम होते. ही जखम त्याने सोंड जोरात ओढल्यामुळे होते. तो जसा बाहेर येतो तसे त्याचे मानजवळून लहानसा रक्त प्रवाह वाहण्यास सुरूवात होते. त्याचे जवळ काही किडे जे मागील जन्मात मासे असतात ते जमा होतात व त्याची जखम चावून चावून मोठी करतात. हत्ती अगदी कासावीस होतो. पण ईलाज नसतो.

ईतक्यात हत्तीचे जवळून, भगवान शंकर पार्वती जात असतात. पार्वतीला त्या हत्तीची खूप दया येते. पार्वती शंकरास म्हणते या हत्तीला तुम्ही मदत करायला पाहिजे कारण तो अत्यंत वेदना सहन करीत आहे. तेंव्हा शंकर भगवान म्हणतात की,... या हत्तीने मागील जन्मात या किडयांना जेंव्हा ते मासे च्या जन्मात होते तेंव्हा मारले होते म्हणून हे किडे मागील जन्माचा फायदा घेत आहेत. तरी पार्वती ला दया आल्यामुळे शंकर भगवान म्हणतात मी याला याचे पूर्ण पापाची शिक्षा मिळेपर्यंत मी काहीच करू शकत नाही. अशा त-हेने तो पापाचे भोग भोगतो.

बालमित्रांनो, या कथेतून हाच बोध घ्यायचा की, नेहमी चांगली कामे करावीत व कोणालाही जीवनात त्रास देवू नये. आपण केलेल्या वाईट कामाची नोंद परमेश्वर ठेवत असतो व त्याचे पायश्चित्त म्हणूनच आपल्याला या जीवनात काहीना काही त्रास होत असतो.

शब्दांकन प्रकाश राऊत अमरावती दि. 14.07.2022

(Ref:-The Greatest Bihari Lok katha by Nalin Varma, read by me on my Kindle reader and freely translated for Marathi Readers.)

## 27.फुलपाखरू – बालसाहित्य कथा- फँटसी कथा

बालमित्रांनो, आता तुमच्या आजपासून शाळा सुरू झाल्या आहेत. त्यामुळे ही माझी शेवटची कथा. तशा तुम्हास माझ्या कथा आवडत असल्यास, तसे मला प्रतिक्रीया देवून जरूर कळवा. तर चला वळू या एका नवीन कथेसहित.

एकदा एका टीचरने सर्व मुलांना सक्त ताकीत दिली होती की, कोणीही आपल्या ड्रेसवर काहीही वेगळे रंगीबेरंगी चित्रे लावून वर्गामध्ये यायचे नाही. केवळ सांगितलेला पोशाख घालूनच वर्गामध्ये यायचे आहे. आजच शाळा सुरू झाल्या आहेत. एका मुलाने उन्हाळयाच्या सुट्टीमध्ये खूप मजा केली बरं कां!आणि नुसतीच मजा केली नाही तर घराच्या बालकनीमध्ये आईला सांगून एक लहानसे गुलाबाचे रोपटे लावले होते. त्या गुलाबाच्या रोपटयावर एक फुल उगवले होते. फुलावर एक फुलपाखरू नेहमी येवून बसायचे. त्या फुलपाखरासोबत या मुलाची एवढी मैत्री झाली की, ते रोज त्याचे हातावर तर कधी खांदयावर बसायचे. या मुलास या गोष्टीची खूप मजा वाटत असे.

या अशा फुलपाखराच्या मैत्रीमुळे काय झाले की, ते फुलपाखरू आजही याचेसोबत शाळेमध्ये, त्या मुलाचे डाव्या हातावर बसून वर्गात आले होते. ते फुलपाखरू रंगीबेरंगी होते. त्या स पाहताच टीचर जाम ओरडल्या. व म्हणाल्या की, 'तुम्हास मी स्पष्ट सांगितले होते ना की कोणत्याही प्रकारचे असे रंगीबेरंगी वस्तू पोशाखावर लावायच्या नाहीत तरी आज वर्गात हा मुलगा असे करून येथे आला आहे'. तो मुलगा म्हणाला,'टीचर ही रंगीबेरंगी वस्तू नाहीतर तो माझा मित्र आहे. वाटल्यास तुम्ही त्यास हात लावून पाहू शकता. जसे टीचरने त्या फुलपाखरास हात लावण्याचा प्रयत्न केला तसे ते फुलपाखरू चटकन हातावरून उडून गेले. यामुळे वर्गातील सर्व मुले खूप हसायला लागली. हे पाहून त्या टीचरला या मुलाचा खूपच राग आला.

या मुलाला वर्गाबाहेर काढले. या बाबीचा मुलाला खूपच राग आला. तो घरी आला तेंव्हा कोणत्याही प्रकारचा अभ्यास करीत नव्हता तसेच दिलेले होमवर्क पण करीत नव्हता. दुस-या दिवशी परत ते फुलपाखरू त्याचे हातावर होते तेंव्हा टीचर म्हणाल्या, 'आरे असे जर तू करायला लागला तर उदया बाकी मुले, त्यांची कुत्रे, मांजरही वर्गात आणायला लागतील. तेंव्हा तू असे कृत्य बंद कर. हे ऐकूण त्याचे हातावरील फुलपाखराला अतिशयच वाईट वाटले व ते त्याचे हातावरून उडून घरी परत आले व लपून बसले. हा मुलगा जेंव्हा घरी आला तेंव्हा त्याला ते

फुलपाखरू दिसेनाचे झाले. त्यास खूप वाईट वाटले. मग त्याने शाळेत जाणेही सोडून दिले. हा मुलगा कां शाळेमध्ये येत नाही हे पाहून त्या टीचरने विचारणा केली. तेंव्हा तिला खरी हकीकत कळली की, या मुलाचे ‘फुलपाखरू’ हरवले आहे.

मग टीचरने त्या मुलास शाळेत फुलपाखरासहीत येण्याची परवानगी दिली. आता मात्र शाळेत एक प्रोजेक्ट मुलांना करायचा होता. त्यासाठी वेगवेगळे विषय ठरविले होते. टीचर म्हणाल्या,’मुलांनो आपल्याला सहा सहाच्या गटाने एक प्रकल्प राबवायचा आहे. विषय आहेत…’विमान, घर व फुलपाखरू’…..तर तुम्ही कोणाच्या गटात जाणार आहात ते ठरवा. तेंव्हा सर्व मुलांनी एकच प्रोजेक्ट निवडला आणि तो म्हणजे ‘फुलपाखरु गट’…ज्या मुलाला फुलपाखरू अतिशय आवडत होते त्याने एक जीवंत असा प्रकल्प, एक ‘लहानशे गुलाबाचे रोपटे’ शाळेमध्ये लावून राबविला. या गोष्टीचा टीचरला अतिशयच अभिमान वाटला.

या मुळे सर्व शाळा ही प्रफुल्लीत झाली अशा प्रकारे तो मुलगा नित्यनियमाने शाळेमध्ये येवू लागला.

तात्पर्य:- मुलांनो, “निसर्गप्रेम हे सर्वात आनंद देणारे माध्यम आहे ”. हेच मला या लहानशा गोष्टीतून सांगायचे होते.

लेखक:- प्रकाश राऊत अमरावती दि. 29.06.2022

************************

## 28.जादूचे अंतरंग- ग्रंथ समिक्षण- कथा

दररोजच्या वाचनात रूची पालट म्हणून काहीतरी नवीन वाचावे, असे आज माझ्या मनात आले. मी शासकीय ग्रंथालयात गेलो व माझ्या दृष्टीस एक पुस्तक पडले. पुस्तकाचे नांव ‘जादूचे अंतरंग’. यापूर्वी मी ‘जादूचा फुगा’असा एक छोटासा प्रयोग बालकांसाठी प्रतिलीपीवर लिहिला होता. असेच अनेक प्रकारचे प्रयोग आपण होतांना पाहतो व आश्चर्यचकीत होतो पण आपल्याला त्यामागील रहस्य सहसा कळत नाही.

हे पुस्तक ‘डेव्ह ऑफ ड्युक’ म्हणजेच ‘महादेव गोखले’ यांनी मनोरमा प्रकाशनांतर्गत लिहिलेले आहे. सदर पुस्तक हे 344 पानांचे असून जवळपास 114 अशा अनेक आश्चर्यकारक

प्रयोगांचे वर्णन व तेही ते प्रयोग कसे घडतात व प्रेक्षक कसे तोंडात बोटे घालतात याचा रहस्य उलघडा करून अत्यंत मेहनतीने लिहिलेले आहे. हा लेखक ईलेक्ट्रॉनिक ईंजिनीअर असला तरी त्यांनी जादूचे प्रयोग शिकण्यास 1962 ला सुरूवात केली होती.

यांचे पुस्तक वाचतांना खूप मजा आली. अत्यंत मजेदार अशा आश्चर्यकारक प्रयोगामध्ये, त्यांनी या पुस्तकात माणसाचे दोन भाग करणे, संपूर्ण अधांतरी माणूस, बांबूच्या टोकावर तरंगणे, भूत महाल, मान धडावेगळी करणे, फ्रेंच गिलोटीन, माणसाला अदृश्य करणे, हॉंगकॉंग मिस्टरी तसेच अनेक पत्त्यांचे प्रयोग आदींचे वर्णन व ते सामान्य माणसांनी कसे करावे, याचे विस्तृत स्पष्टीकरण फारच सुंदर रित्या समजावून सांगितले आहे.

पुस्तकाची किंमत जरी दोनशे रूपये असली तरी वाचनालयातून आणून सदर पुस्तकाचा आनंद प्रत्येकाने घ्यावा असे मला वाटले म्हणून मी हे संक्षिप्त समिक्षण आपल्यासमोर सादर केले आहे. लहान मुलांसाठी सहज वाचन करता येईल अशा पध्दतीने हे लिहिलेले आहे.

पूर्वी आपल्या भारतात व विदेशात असे जादूचे प्रयोग फार व्हायचे. बंगाली जादूगार सरकार, के. लाल, जादूगार रघुवीर अशी अनेक नावे आपण ऐकलेली आहेत पण आजकाल ही कला काळाच्या ओघात लोप पावत आहे याचा मला खेद व तितकेच आश्चर्य  वाटत आहे. सर्कस आणि जादूचे प्रयोग हे कां बंद झाले, हा भाग आपण सोडला तरी अशाप्रकारची पुस्तकेही आपण अधून मधून वाचत राहले पाहिजे एवढाच काय तो माझा या लेखनाचा हेतू आहे.

जादू ही मुळात अस्तीत्वातच नाही. जे जादूगार आपल्याला हात चलाखीने असे खेळ समोरासमोर दाखवून आश्चर्यचकीत करतात त्यामागे त्यांची प्रॅक्टीस व मेहनत निश्चितच असते, असे मला वाटते. जादू शिकण्याच्या काही प्रयोगशाळा पण असतील तेथेही प्रचंड प्रॅक्टीस महत्वाची आहे. प्रयोगाला बरेच वेगळया प्रकारचे साहित्य लागते पण लहानसहान प्रयोग करून, आजही आपल्या सभोवतालच्या लोकांचे मनोरंजन करता यावे हयासाठीच मी हे पुस्तक प्रत्येकाने वाचावे असा आग्रह धरून आजचे हे संक्षिप्त समिक्षण संपुष्टात आणतो.

धन्यवाद !

लेखक प्रकाश राऊत अमरावती दि. 14.06.2022

********************************

## 29.बाईशी बोलणं........मर्मभेदक विनोदी व व्यंगकथा

ज्या व्यक्तिंना गावोगावी फिरावे लागते व शासनाची ड्युटी करावयाची असते त्या व्यक्तिवर केंव्हा काय प्रसंग येतील हे सांगता येत नाही. अशा प्रसंगात चूक नेहमी कोणाची हे ठरविणेही कठीण जाते. मी असाच एका घटनेला सामोरे गेलो आहे. मला याची पूर्ण कल्पना आहे की, दर बारा गावांच्या अंतरात भाषेत फरक पडत असतो पण काळजी तरी किती घेणार. ही झाली थोडक्यात प्रस्तावना.

चिखलदरा उदंचन योजनेच्या कामावर शाखा अभियंता असल्यामुळे मला नेहमीच सर्व्हे करायला जावे लागत असे. काम म्हटले की, मजूरवर्ग आलाच. ते सुध्दा मराठीतच बोलत असे पण त्यांची मराठी थोडी निराळी होती.

सर्व्हे चालू असतांना एक बाई, बाई कसली ती माझ्या दृष्टीने चवदा वर्षाची मुलगीच होती. आता आमच्या विदर्भात कोणी कामचुकारपणा केला की, आम्ही सर्रासपणे त्यास म्हणत असतो की, तुझ्या जीवावर आलं कां रे बाबा... बस हेच वाक्य मला भोवले. त्या मुलीला मी हे वाक्य बोललो. ती जी जाम गरम झाली की, साधा विषय तीने फरफटतच नेला.

साहेब, तुम्हाला बाई माणसाशी कसं बोलावं हे कळते कां? मी काय बोललो मी तर साधंच बोललो नां! बाईमाणसाला जीवावर आलं कां असे म्हणत असतात काय. मी स्तब्ध झालो व वाद वाढवला नाही पण ती सारखी बडबडत असल्याने मला नाईलाजास्तव लोकल सुपरवायझर महादेवला ही बाब सांगावी लागली. महादेव बोलला....साहेब असे शब्द आमच्याकडे चालत नाही. “जीवावर” याचा अर्थ वाईट होतो.

असाच एक दुसरा प्रसंग. माझ्या मोथा साईटवरील लोकल शेडजवळ एक अंगणवाडी ची मास्तरीन कार्यरत होती. तसा तीचा आणि आमचा फारसा संबंध येत नसे पण सुशिक्षीत लोकं त्या भागात कमी असल्याने आमच्याशी ती कधी कधी बोलायची. कालांतराने आम्हीच तीला परतवाडयाचे एक स्थळ शोधून दिले व तीचा विवाह झाला. लवकरच तीला गर्भधारणा झाली. वास्तविक हा तीच्यासाठी आनंदाचा प्रसंग होता. चारपांच महिण्याचा कालावधी निघून गेल्यानंतर तीने मला चहासाठी बोलावले. सोबत माझा मित्रपण होता. चहा झाला आणि मी

सहज बोललो... वहिनी, “आता किती महिणे राहले”. हे ऐकूण ती जाम भडकली व बोलली की, बाईमाणसाशी असं बोलतात काय. आता पुन्हा मी पेंचात पडलो व मित्राला कँपवर आल्यावर म्हणालो की, मित्रा मी नेमकं काय चुकलो रे...तो जोरात हसला व मला म्हणाला आऽऽरे , असं म्हणायचं नसतं.....मग काय म्हणायचं असते....आSSरे, वहिनी पेढे कधी मिळणार असं बोलायचं असतं...मला माझी चुक लवकर लक्षात आली. मी त्यानंतर बाई माणसांशी बोलणंच सोडून दिलं आहे.

प्रसंग कसाही असो माणसानं सुधारावं हे मी पक्के ठरविले. सन 2010 ला माझी बदली गडचिरोलीहून थेट नाशिक ला झाली. यावेळी माझे प्रमोशन होवून मी उपविभागीय अधिकारी म्हणून मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेशात रूजू झालो. दुधाने तोंड भाजल्यावर मी ताकही फुकून प्यायला लागलो.आणि मला तेथेही कळले की, नाशिक परीसरात बाईला “बाई” म्हणू नये “मावशी” म्हणावं...

विदर्भासारखं ऑटो म्हणू नये रिक्शा म्हणावं..रेस्टॉरंटमध्ये आलूबोंडा म्हणू नये “ बटाटावडा म्हणावं...कोहळयाच्या भाजीला कोहळ म्हणू नये “गंगाफळ” म्हणावं...सांबार म्हणू नये कोशिंबीर म्हणावं..वगैरे वगैरे ...असो अशा या भाषेच्या गंमती सध्या रिटायर्ड झालो तरी आठवत राहतात. हे आवडलं असेल तर प्रतिक्रीया दया कारण “आम्ही विदर्भवाले लयच बेकार बोलतोनं राजेहो....”

मित्र बोलला....समजलं न बे तुले आता........

लेखक प्रकाश राऊत अमरावती दि. 25.04.2022

********************************

30.प्रदर्शन- उत्साहवर्धक विनोदी कथा- काल्पनिक

I am constantly making exibitions in my head.- Thelma Golden

( Ref:- Brainy Quotes)

काल पर्वा अमरावतीमध्ये सायन्सस्कोअर मैदानात एक प्रदर्शन लागले. प्रदर्शनाचे नाव होते National Craft and Handloom Expo- Exhibition cum Sale. हे प्रदर्शन लागले याची मला जाणीव असूनही मी त्याकडे दुर्लक्ष करीत होतो कारण मला एक सॉक्रेटीसची गोष्ट आठवली. सॉक्रेटीस म्हणे रोज बाजारात जायचा. पूर्ण बाजार पाहून झाला की, तो रोज काही न घेता वापस यायचा. हे एका जणाला पटले नाही व शेवटी त्याने त्या सॉक्रेटीसला विचारलेच.

‘कां हो तुम्ही रोज बाजारात जाता पण तेथून काहीच आणत नाही मग बाजारात जाता तरी कशाला?

‘ अहो मी बाजारात जातो ते हे पाहण्यासाठी की, या सर्व गोष्टीतील कोणती गोष्ट मला नको आहे. मग मी ठरवतो की, ‘यातले मला काहीही नको आहे’ म्हणून मी परत येतो. आता प्रश्न उरला की मी वारंवार कां जातो. त्याचं उत्तर असं आहे की, गेल्याशिवाय मला हे कळणार कसे की, बाजारात नवीन  आलेल्या वस्तू सुध्दा मला नको आहेत. हे सांगण्याचा उद्देश एवढाच की, मी सुध्दा बरेचदा केवळ जाण्यासाठी जातो, घेण्यासाठी नाही कारण माझे मोहावर काही प्रमाणात नियंत्रण आहे. असो. तर मुख्य मुद्याकडे वळू.

दुपारची दिर्घ अशी माझी वामकुक्षी झाली. दुपारचा ‘प्रेमाचा चहा’ही बायकोने केला. चहा तृप्ती झाल्यानंतर मला न आवडणारे कथन तीने केले. आता तुम्हाला बोध झालाच असेल की, माझ्या बायकोला हे कथीत प्रदर्शन पहायला जायचे होते. प्रथम टाळाटाळ केली व नंतर सर्वच नव-याप्रमाणे मी सुध्दा तयार झालो. प्रथम ‘सायन्सस्कोअर मैदानातून अलीकडे स्कूटर फार चोरीला जातात’ अशी एक लहानशी फुसकी मी सोडली पण तिचा काही उपयोग झाला नाही. शेवटी मी तयारी केली व आम्ही उभयता ते प्रदर्शन पाहण्यासाठी गेलो.

प्रदर्शनाचे मुख्यद्वार एवढे सजविलेले होते की, कोणीही प्रथम तेथे बायकोचा फोटो काढेन. मी पण तिच्या आग्रहास्तव एक फोटो काढला. नंतर वर दिलेल्या कोटेशननुसार मी प्रथम माझ्या डोक्यातच प्रदर्शन भरवलेले होते. काहीही घ्यायचे नाही असे ठरवूनच टाकलेले होते त्यामुळे प्रदर्शन पाहतांना पुढे लवकर लवकर जाण्याचा माझा वेग वाखाणण्यासारखा होता. प्रदर्शनात ती विविध वस्तू पण स्वस्त अशा पाहण्यात गुंग झाली होती आणि मी मात्र प्रदर्शनात आलेल्या प्रत्येक जोडप्याकडे पाहत होतो. कुत्र्याला बाहेर फिरायला नेल्यावर जसे कुत्रा मालकाला ओढत नेतो तसेच बायका त्यांच्या नव-याला आवडीच्या स्टॉलवर ओढत नेतांना

मला दिसल्या. मात्र एखादे ठिकाणी नवरा कां थांबला तर ईतरांच्या बायका म्हणायच्या की,‘चला न हो लवकर, काय ते पहात बसले.’ प्रदर्शनात कोणाचीही बायको प्रथम लहानात लहान वस्तू घेण्याचा प्रयत्न करते. अहो, थांबाना हे बघा कंगवा साफ करण्याचे यंत्र, प्लॅस्टीकचेच आहे व किंमत तर केवळ वीसच रूपये आहे. मग कोणताही नवरा या बाबीला विरोध करीत नसतांना मला आढळला. काही बायका तर ‘तिकडे दोनशे रूपयाची वस्तू तर केवळ शंभरलाच मिळते’ अशा शिफारसीपण करतांना मला आढळल्या. मी काहीही घेत नाही हे पाहून माझी बायको सुध्दा माझा उत्साह वाढवीत होती. मग मी सुध्दा माझ्या नेहमीच्या सवयीप्रमाणे केवळ साठ रूपयाची गोड सोप घेवून प्रारंभ केला. ईतक्यात मला एक आमच्या साहेबांची बायकोही तेथे दिसली. ती पण नेहमी कोणत्याही प्रदर्शनात शंभर रूपयांच्या वर वस्तू घेत नाही. मला नेहमी हा प्रश्न पडतो की, हया लोकांना बाहेर प्रदेशातून येवून हे परवडतेच कसे पण असो तो त्यांचा प्रश्न आहे.

साधारणपणे एक तास मनोरंजन झाले व प्रदर्शन पाहणे संपले. फारसा खर्च झाला नाही याबाबत मी माझ्या बायकोचे थोडे कौतुकही केले व घरी आलो. तरी ती घरी आल्यावर मला म्हणालीच की, पहा बरं ‘स्कूटर कोठे चोरीला गेली’,उगीच काहीतरी मला सांगत असता आणि टाळत असता प्रदर्शन पहायला. यातून तीला नेमके काय सुचवायचे आहे हे मला अजून कळलेले नाही. सांगण्याचा हेतू एवढाच की, आपणही सॉक्रेटीससारखे वागू नका काहीतरी जीवनात आनंद घेत चला कारण सॉक्रेटीस नेहमी म्हणायचा की, ज्याची बायको भांडण करीत असते तो नेहमी फिलॉसॉफर होतो. आता फिलॉसॉफर व्हायचे की, नवरा म्हणून जगायचे ते तुम्हीच ठरवा.

आजचा क्षण मात्र एक तास कां होईना पण आनंदात गेला व एक कथा लिहिण्याचे सुचले यापेक्षा लेखकाला आणखी काय हवे..

धन्यवाद!

लेखक प्रकाश राऊत अमरावती दि. 14.11.2022

**********************

**प्रदर्शन भाग 2- उत्साहवर्धक अनुभवकथा**

**“exhibition is the result of your experiments.”-Chris Ofili**

नाशिकला असतांना माझ्या सरकारी बंगल्यासमोर म्हणजेच कान्हेरी मैदानात नेहमीच कोणते ना कोणते प्रदर्शन सतत लागत असे. माझ्या घराजवळच असल्यामुळे मी संध्याकाळचा वेळ त्या प्रदर्शनात घालवीत असे.

एकदा पुस्तकांचे प्रदर्शन तेथे लागले होते. सर्व स्टॉलवर फेरफटका मारून झाला. माझ्या मनात एक विचार आला की, किती दिवस आपण दुस-यांचीच पुस्तके वाचावीत. आपणही एखादे पुस्तक जर लिहिले तर काय वाईट. पण लगेच मनात विचार आला की, आपल्यासारख्याचे पुस्तक वाचणार कोण. तरीसुध्दा मनात आलेल्या विचाराला चालना मिळावी, या हेतूने मी मोठया धाडसाने एका तरूणाला विचारलेच.

‘सर, आपण केवळ पुस्तके विकता की, काही ईतरांच्या पुस्तकांचे प्रकाशन पण करता?’ लगचे उत्तर मिळाले की, तर तुमचे स्क्रीप्ट तयार असेल तर आम्ही प्रथम ते वाचू व नंतर ठरवून तुम्हास सांगू. मला खूप हायसे वाटले. मी माझ्या जीवनातील अनुभव म्हणून एक पुस्तक लिहायला घेतले. पुस्तकाचे नांव ठेवले, ‘नोकरशाहीतील बाळूच्या गंमतीजमती’.

मुख्य अभियंता कार्यालयात शासकीय कामातून वेळ काढून पुस्तक लिहायला सुरूवात केली. पहिल्या वीस पानातच माझा उत्साह मावळू लागला पण माझी कन्या मृदुला हिने वारंवार सुचित करून माझा उत्साह वाढवला. अशा त-हेने माझे पहिले पुस्तक तेही पुण्यातून ‘ज्ञानगंगा प्रकाशना’तर्फे प्रकाशीत झाले. तरूण प्रकाशक श्री. कुणाल हजेरी यांनी सहकार्य केले त्यामुळे मी त्यांचा खूपच ऋणी आहे. माझ्या लिखाणाच्या प्रयोगाचे पहिले प्रदर्शन मला घडले.

त्यानंतर मी ‘आजच्या जगात वावरतांना’ हे पुस्तक लिहिण्याचा प्रयत्न केला. यावेळी मात्र जास्तीत जास्त वाचकांनी हे वाचावे म्हणून मी सदर पुस्तक ई साहित्य डॉट कॉमवर ते प्रसिध्द केले. या पुस्तकाला मात्र पश्चिम महाराष्ट्रातून खूप प्रतिसाद मिळाला.

आपण काय लिहितो हे महत्वाचे नसते तर लोकांना काय वाचायला आवडेल अशा पध्दतीने लेखकाला विचार करावा लागतो मग त्यातूनच सर्जनशीलता प्राप्त होत जाते. अशा

पध्दतीने एखादे प्रदर्शन पाहल्यानंतरही माणूस लेखक बनू शकतो याचा अनुभव मला तुमच्या सोबत शेअर करावासा वाटला. म्हणूनच हा लेखनप्रपंच वाचकांसमोर सादर केला. खरं तर मला लिखाणापेक्षा वाचनाची जास्त आवड आहे. माझी वाचन तृप्ती होणे या जन्मात तरी शक्य नाही. आपणही काही हलकंफुलकं वाचत राहावे हीच सदिच्छा.

धन्यवाद!

प्रकाश राऊत अमरावती दि. 15.11.2022

********************************

**प्रदर्शन भाग 3- उत्साहवर्धक कथानुभव**

कोणत्याही गावात प्रदर्शन भरले की, गावातील हौसे,गवसे व नवसे यांची गर्दी होतांना आपण नेहमीच पाहतो. असाच मला माझे जीवनात अनेकदा अनुभव आला आहे. मी तोतलाडोह परीसरात कार्यरत असतांना शेरपापडयाची यात्रा फार प्रसिध्द होती म्हणे. वास्तविक ‘शेरपापडा’ हे नावावरूनच माझे लक्षात आले होते की हे आदीवासी भागातील लहानसे गांव असावे. व तेथे अशा यात्रा किंवा जत्रा भरत असावी.

माझ्या समकक्ष अभियंता मित्रांनी अशा यात्रेला जायचे ठरविले. तोतलाडोह परीसर हा मध्यप्रदेश व महाराष्ट्र या सीमारेषेवरचा भाग. यात्रेत म्हणे रात्रीच खूप मजा येते. तरूणपणात मजेचा अर्थ वेगळा येथे सांगायला नको. ठरल्याप्रमाणे आम्ही सहा सात मित्र मोठया हौसेने आपापल्या मोटरसायकल घेवून त्या जंगली रस्त्याने रात्री सात वाजता निघालो. रस्ता अगदी वळणाचा होता. जणूकाही ती पायवाटच. आम्ही आपल्या गाडया एकमेकांच्या लाईट्समध्ये चालवत गेलो. जवळपास आठ ते दहा किलोमीटर जावूनही ते गांव आम्हाला आढळत नव्हते. शेवटी सगळेच पहिल्यांदा जात असल्याने आता मागे जाण्यात काहीच अर्थ नाही असे ठरवून पुढे निघालो. तर पुढे जंगलही संपले व सरळ जमीनीवरचा रस्ता लागला. मग काय आम्ही आमच्या गाडया जोरात दामटवल्या. साधारणपणे नऊ साडे नऊच्या दरम्यान आम्ही किर्र जंगलातून आमच्या डेस्टीनेशनला पोहोचलो.

उत्सुकतेच्या पोटी त्या यात्रेत आम्हाला असे वैशिष्यपुर्ण काहीच आाढळले नाही. काही आदीवासी स्त्रिया कशातरी नाचत होत्या. काही जलसे असे होते की त्यात लोकगीते सादर केल्या जात होती. आजही मला आठवते ....कोई झलके ना गागरीया जरा धीरे चलोरी...धीरे चलोरी बाबा धीरे चलोरी... किंवा गरीबाची लेक ती विकत होती भारा ....पाहून घे गा घडीत दादा वाजून गेले बारा... पण अशा गाण्यात आम्हाला कवडीचाही रस नव्हता. आमच्या मित्रांना वेगळाच रस होता. जलसा आटोपल्यावर या आदीवासी तरूण स्त्रिया मजा करायला मिळतात असा आमच्या मित्रांचा गोड गैरसमज होता. म्हणून रात्री बारापर्यंत सगळयाच शौकीन मित्रांनी आतुरतेने वाट पाहली. जलसा संयोजकाशी  काही गरजू मित्रांनी संपर्क केला पण त्यांना तीरकमठयाची भाषा त्यांनी ऐकवली. ते म्हणाले साहेब आम्ही गरीब आदीवासी सर्व काही मनोरंजन करू पण तसल्या व्यवहारात पडत नसतो. एकंदरीत सांगायचे तात्पर्य असे की, एवढा मोठा डोंगर पोखरून खरोखरच उंदीर निघाला. वापस यायला फार रात्र झाल्यामुळे आम्ही सर्व तसाच थंडीत कुडकुडत टाईमपास केला व पहाट पहाटे तेथून परतीच्या निराशात्मक प्रवासास निघालो.

काही कुत्सित मित्रांनी तर असे वक्तव्य केले की, आरे यार याच्यापेक्षा तर नागपूरची ‘गंगाजमुना’ यात्रा परवडली असती.. असो तुम्ही आता मला नागपूरला ‘गंगा जमुना’ क्षेत्र कशाला म्हणतात हे कृपया ‘मला’ विचारू नका कारण तसला मला अनुभव नाही. तरीपण मी अमरावती परीसरातील ‘बहिरम यात्रे’ची पुर्वीची मजा पुढील भागामध्ये केवळ मनोरंजनासाठी सांगेन. तोपर्यंत वेळ काढून असे चुटुकपुटुक काहीतरी वाचत चला. तुमचे बरेवाईट कॉमेंट्स आमच्या लेखकांचा उत्साह वाढवित असतात.

वाचकांचे आभार !

टीप:- सगळंच काही लिखाणात सांगता येत नाही... राव.. काही गोष्टी समजून घ्याव्या लागतात. कारण आम्ही लेखक नेमकं काय लिहितो याकडे आमच्या बायकांचाच डोळा असतो. हवं तर हे त्यांचे तिसरे नेत्र समजा...

............................................................................

**प्रदर्शन भाग 4- उत्साहवर्धक अनुभव कथन**

मागच्या भागात मी आपणास ‘शेरपापडयाची यात्रा’ हा अनुभव सांगितला. या भागात त्याहीपेक्षा ‘रूचकर व मजेदार’ किस्सा सांगण्याचा प्रयत्न करणार आहे.

अमरावती परीसरात सुमारे साठ किलोमीटरवर मध्यप्रदेशाकडे जाणा-या रस्त्यात एक ‘बहिरमची यात्रा’ दरवर्षी भरत असते. या यात्रेचा कालावधी साधारणपणे वीस डिसेंबर ते वीस जानेवारी असा आहे. ही यात्रा बहिरम यात्रा या नावानेच प्रसिध्द आहे. एक लहानसे कदाचीत गांव असावे तेथे एका पहाडावर बहिरम हा देव मूर्तीरूपात अस्तित्वात आहे. तो जागृत असल्याची ही आख्यायिका आहे. कोणताही देव ही संकल्पना मानवीच असते त्यामुळे मानवाने आपापल्या ईच्छापूर्तीसाठी म्हणा की आपल्या संरक्षणासाठी म्हणा निर्मीती केलेली आहे असे मला वाटते कारण हा जो देव आहे त्याला म्हणे ‘मटनाचा प्रसाद’ चालतो.

अर्थातच येथे हंडी मटन मिळणे साहजिकच आहे. काही ठिकाणी तर आपले मटन घेवून जायचे व ते हंडीवर शिजवून मिळते त्याचा प्रसाद देवाला दिला की बाकी आपणच आपल्या मित्रांसमवेत ते हादडायचे असा प्रकार आहे. आता प्रसाद म्हटलं की , तीर्थ आलेच. मटनाला साजेचे असे तीर्थ हे मदयच असणार दुसरे ते काय? ही झाली खाण्यापिण्याची मजा. यामुळेच ही यात्रा फार प्रसिध्द आहे. देवाच्या नावावर सर्व गुन्हे माफ असा काहीसा प्रकार येथे चालायचा. सध्या तो प्रकार माननीय श्री. बच्चू कडूची आमदार यांनी बंद केला आहे. ही त्यांची सामाजिक सेवा स्तुत्य आहे. पण दोन वर्षापूर्वी काय व कसे चालायचे याचे चविष्ट वर्णन थोडक्यात सांगतो.

मध्यप्रदेशची बॉर्डर व जंगली भाग म्हटलं की, गरीब आदीवासी आलेच. त्यांचे पोटापाण्याचा प्रश्न हा यक्षप्रश्न आहे. या यात्रेत नेहमीप्रमाणे हौसे गवसे नवसे येत असल्याने यात्रेच्या रात्रीला पंधरा दिवस तरी जलसे, नाच, व ईतरही धंदे येथे चालायचे.

अप्पर वर्धा प्रकल्प वसाहतीत मी सन 2000 च्या दरम्यान राहात होतो. माझ्याकडे त्यावेळी एक सेकंड हँड फियाट होती. त्याकाळात अशी कार कोणाकडेच नव्हती म्हणून मला माझे मित्रांनी आग्रह केला की, आपण बहिरम यात्रेला मजा करण्यास जावू. अर्थात त्या देवाला चालणारा तीर्थ प्रसाद आम्ही अर्पण करणार व नंतर आम्ही त्याचा स्वाद घेणार हे जवळपास

निश्चितच झाले होते. त्यावेळी मीच कार ड्रायव्हींग करीत असे. माझा तेथे जाण्याला विरोध होता कारण येतांना रात्र होणार व ड्रायव्हींग मलाच एकटयाला करावे लागेल आणि त्याचा त्रास मला एकट्यालाच होणार होता. पण ठरल्याप्रमाणे मित्रांनी तो बेत आखलाच. माझे मित्र म्हणजे

'बळी तो कानपिळी'असे होते. आम्ही ठिक रात्री सात  वाजेपर्यंत तेथे पाहोचलो. 'तीर्थासी जाता कधी पावला न' अशी माझी अवस्था होती. जातांना सर्व उत्साहीत होते. त्या माझ्या पामर गाडीत करकचटून सहा जण मी धरून बसलो होतो. गाडी जुनी असल्याने ओढतांना आक्रसून जात होती पण बैलाला जसा उपाय नसतो तसा माझ्या गाडीच्या इंजिनलाही काही ओढल्याशिवाय दुसरा उपाय नव्हता.

मटनाचा प्रसाद आही ग्रहण केला. आता प्रश्न होता तो काहीतरी वेगळीच मजा करायची. जीवन हे मजेसाठीच असते अशी आमच्या मित्रांची फिलॉसाफी होती. या गटातील काही मंडळी ही 'डेअर डेव्हील' होती त्यामुळे त्यांचेच मागे मी असे वरच्या भागाकडे जिकडे जलसे नाच गाणे वगैरे होते, तिकडे फिरायला गेलो. काळयाकुट्ट मुलींनी जास्तीतजास्त पावडर लावून स्वत:ला सुशोभीत करण्याचा आटोकाट प्रयत्न केला होता. आमच्यापैकी आंबट शौकीन मित्रांनी नयनसुखाचा आनंद घेतला. त्यातील एका कुत्सिताने अनावश्यक खर्च करून हात वगैरे लावण्याचाही प्रयास केला पण पोलीसांच्या व्यवस्थेमुळे त्याला पुढे जाता आले नाही. असो. एकंदरीत सर्वांनी 'ओठ चाटून भूक भागवण्याचा' प्रयास केला.

परतीच्या प्रवासात मी एकटाच गाडी ड्रायव्हींग करीत होतो व बाकी सर्व तीर्थात न्हालेले असल्याने ढारढूर झोपले होते कारण रात्रीचे बारा वाजले होते. अशाच परीस्थितीत मग माझी गाडी जुनी असल्याने बंद पडली. कारण मला माहीत होते की , बॅटरीत पाणी टाकावे लागणार होते. कोणीही उठावयास तयार नव्हता. कठीण समय येता कोण कामास येतो असाही अनुभव मला आला. पण एक मित्र उठला  व आम्ही बॅटरीत व रेडियेटरमध्ये पाणी टाकून पुढील प्रवास सुखरूप केला. अशी ही 'बहिरम यात्रा' न भूतो न भविष्यती ठरली.

हा अनुभव आपणास कसा वाटला ते जरूर कळवा. किंवा केवळ प्रतिक्रीया न देता मला प्रतिसाद देत चला, ही सर्व वाचकांना विनंती.

धन्यवाद!

लेखक प्रकाश राऊत अमरावती दि. 5.12.2022 Ph. 95525 43947

************************

## लेखक परीचय

प्रकाश राऊत हे शासकीय सेवेत उपविभागीय पदावर 2013 पर्यंत कार्यरत होते. आजपर्यंत त्यांनी तेराचे वर पुस्तके लिहिलेली आहेत. ते विनोदी स्वभावाचे असून त्यांचे वाचन अत्यंत दांडगे आहे. त्यांचे वैयक्तिक वाचनालयात तीन हजारचे वर ग्रंथ साठा आहे. ते सध्या अमरावती महाराष्ट्र येथे राहात असून सातत्याने त्यांचे लिखाण याही वयात चालू आहे. त्यांची पुस्तके ज्ञान प्रकाशन पुणे यांनी छापलेली आहेत. त्यांचे ई साहित्यवर ही पुस्तके वाचण्यासाठी मोफत उपलब्ध आहेत. प्रतिलीपी ॲपवर तर त्यांचे साठ हजारचे वर वाचकसंख्या गेलेली आहे.

---

The End

**************